पुष्टिमार्गीय ग्रंथमाला पुष्प १ लें.

# पुष्टिमार्गीय-सिद्धांत-रत्नहार.

## ( DOCTRINES OF PUSTIMARGA ).




लेखक

कृष्णदास नथभाई शाह.


एकं शास्त्रं देवकीपुत्रगीतम् ।
एको देवो देवकीपुत्र एव ॥
मंत्रोऽप्येकस्तस्य नामानि यानि ।
कर्माप्येकं तस्य देवस्य सेवा ॥

—श्रीमद्वल्लभाचार्याः


मुंबई इ. स. १९३५ ] प्रथमावृत्ति [ किमत १ रुपया.

# पुष्टिमार्गीय-सिद्धांत-रत्नहार

१



जगद्गुरु श्रीमत् वल्लभाचार्य

लेखकः—

क. न. शाह




श्रीगोस्वामिकुलकौस्तुभ पूज्यपाद गोस्वामी श्री १०८ श्रीगोकुलनाथजी महाराज, मुंबई.

# अर्पणपत्रिका

जगद्गुरु श्रीमद्वल्लभाचार्यवंशावतंस
पूज्यपाद गोस्वामी श्री १०८
श्रीगोकुलनाथजी महाराज
यांस
त्यांच्या ठायीं वसत असलेली आदर्शभूतशुचिता,
स्निग्धवृत्ति, सौजन्य, औदार्य, अलौकिक-
विद्वत्ता व प्रभुप्रेमपरायणता इत्यादि
अनेक सद्गुणावर लुब्ध होऊन
हा रत्नहार त्यांच्या पवित्र
सेवेंत सादर समर्पण.



# हकीकत

महाराष्ट्रांत वल्लभसंप्रदायी वैष्णववर्गाची संख्या फार मोठी आहे. ते जातीनें गुजराती असले तरी त्यांची भाषा मराठी बनली आहे. तेव्हां त्यांच्या हातांत या संप्रदायाच्या सिद्धांतज्ञानाचें एकादें पुस्तक मी मराठी भाषेंत लिहून द्यावें अशी इच्छा माझे चहाते श्रीयुत वल्लभदास चुनीलाल पुणेकर यांनी मजजवळ प्रदर्शित केली, व त्यांनीं मला तसें ग्रंथ-साहाय्यहि पुरविलें; परंतु या सेवेला मी योग्य आहें कीं नाहीं याची मला शंका आहे. तरीपण हें पुण्याचें वाण हातचें दवडूं नये असा निश्चय करून पुष्टिमार्गीय सिद्धांताचें विवेचन करण्याचा हा यथामति अल्प प्रयत्न केला आहे. पुष्टिमार्गीय वाङ्मय विपुल आहे; परंतु कित्येक संकुचित मनाच्या सांप्रदायिक विद्वानांनीं आपल्याजवळच तें वाङ्मय वर्षानुवर्षें राखून ठेविलें. त्याचा प्रसार केला नाहीं. यामुळें महाराष्ट्र त्यापासून अज्ञात राहिला. माझ्या अल्पज्ञानाप्रमाणें मराठी भाषेंत लिहिलेलें हें माझें पहिलेंच पुस्तक होय. या माझ्या लिखाणानें जर पुढें कोणास या संप्रदायावर सुंदर ग्रंथ निर्माण करण्याची चालना मिळाली तर माझ्या श्रमाचें श्रेय मला मिळालें असे मी समजेन. कारण माझ्यापेक्षां विद्वत्तेनें, ज्ञानानें व अनुभवानें अधिक असें समर्थ पुरुष या महाराष्ट्रांत विद्यमान आहेत. ही महाराष्ट्रभूमि म्हणजे आध्यात्मिक ज्ञानज्योति प्रकटविणारी विश्ववंद्य साधूसंतांची व महर्षींची जन्मदात्री माता! तिच्या प्राङ्गणांत ज्ञानाचें

अखंड सत्र ज्ञानेश्वरापासून आजतागायत चालू आहे. तेव्हां या संप्रदायाकडे जर एकाद्या विद्वानाचें लक्ष गेलें तर हा एक विश्वव्यापी धर्म बनल्याशिवाय खास राहाणार नाहीं, असा प्रस्तुत लेखकाला आत्मविश्वास आहे.

आज विजयादशमीच्या सुमुहूर्तावर वाचकांच्या हातांत हें पुस्तक देतांना लेखकाला आनंद वाटतो. परंतु त्या अगोदर ज्या ज्या मित्रांच्या व थोर विद्वान् मंडळीच्या साहाय्यानें, प्रेरणेनें व प्रोत्साहनान आज हें पुस्तक प्रकाशांत येऊं शकलें त्यांचे आभार मानलें पाहिजे.

या बाबतींत प्रथम उल्लेख श्रीयुत वल्लभदास चुनीलाल पुणेकर यांचा केला पाहिजे. कारण त्यांनीं जर मला हें पुस्तक लिहिण्याची प्रेरणा केली नसती, तर आजचा हा आभार मानण्याचा सुयोगच आला नसता. याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे.

दुसरा उल्लख या संप्रदायाचे सुप्रसिद्ध विद्वान् श्रीयुत् हरिकृष्ण शास्त्री 'शुद्धाद्वैतविशारद' 'शुद्धाद्वैतालंकार' यांचा केला पाहिजे. त्यांनीं या पुस्तकाची हस्तलिखित-प्रत वाचून जो संतोष व्यक्त केला, व ज्या अमोल सूचना केल्या त्याबद्दल मी त्यांचें अंतःकरणपूर्वक आभार मानतों.

सर्वापेक्षां विशेष उपकार मला श्रीगोस्वामिकुलकौस्तुभ पूज्यपाद गोस्वामी श्री १०८ श्रीगोकुलनाथजी महाराज यांचे मानले पाहिजे. त्यांच्या कृपाप्रसादानेंच हें पुस्तक प्रकाशांत येऊं शकलें. त्यांनीं माझ्या नम्र विनंतीला मान देऊन स्वतःचें पुनित नांव व छायाचित्र या पुस्तकांत दाखल करण्याची अनुज्ञा दिली, त्याबद्दल मी 'त्यांचा अत्यंत ऋणी आहे.

हे प्रास्तविक पर्ण करण्याच्या अगोदर मला वे. शा. सं. गजानन शंभु साधलेशास्त्री यांनीं या पुस्तकांत लिहिलेलीं श्रुति–स्मृति-पुराणांतील प्रमाणवचनें त्यांच्या मूलस्थ श्लोकांसह तपासून दिलीं व इंदुप्रकाश छापखान्याचे मालक श्रीयुत यंदेशेटजी व त्यांच्या साहाय्य-कारी मंडळींनीं जी तत्परता दर्शविली त्याबद्दल मी या सर्वांचें हार्दिक आभार मानतो, तसेंच माझे सन्मित्र श्रीयुत नटवरलाल शंकरलाल यांनीं मला या पुस्तकाच्या लेखनासंबंधीं ज्या योग्य सूचना केल्या व अनेक प्रकारें मला साहाय्य केलें, त्याबद्दल त्याचा साभार उल्लेख केल्याशिवाय मला रहावत नाहीं.

आधारभूत ग्रंथाची यादी सोबत जोडली आहे. त्यांच्या कर्त्यांचाहि मी अत्यंत ऋणी आहे.

पूर्ण काळजी घेऊन सुद्धां या पुस्तकांत कांहीं मुद्रणदोष राहिले आहेत, ते सहृदय वाचक सुधारून वाचतील अशी माझी त्यांना नम्र विनंती आहे.

पुष्टिमार्गाचा प्रवास करीत असतांना जी सिद्धांतरत्नें सांपडलीं त्यांचा हार गुंफून तो मी रसिक वाचकांस सादर करीत आहें. माझ्या अल्पबुद्धीला शक्य असा अति अल्प प्रयत्न हा पुष्टिमार्गीय सिद्धांत रत्नांचा हार गुंफण्यांत केला आहे. तो कितपत सुंदर गुंफला गेला हें रसिक वाचकवृंदच सांगतील.

ता. ७–१०–३५.
विजयादशमी शाके १८५७.
मोठें मंदिर, भुलेश्वर,
मुंबई नं. २.

आपला,
नम्र सेवक,
**कृष्णदास नथूभाई शाह.**

# आधारभूत ग्रंथ.

**संस्कृतः**– (१) अणुभाष्य (२) तत्त्वदीपनिबंध ( ३ ) सुबोधिनी.
(४) षोडशग्रंथ (५) अष्टाक्षरनिरूपणम्–श्रीविठ्ठलनाथजी.
(६) स्वमार्गीयशरणसमर्पणसेवादिनिरुपणम्– व
(७) पुष्टिमार्गलक्षणानि–श्रीहरिरायजी.

**मराठीः**– (८) गीतारहस्य (९) महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास– श्री. पेंडसे. (१०) गोमांतक शुद्धीचा इतिहास–श्री. मसूरकर महाराज.

**गुजरातीः**–(११) श्रीवल्लभचरित्र–श्री. परेख. (१२) पुष्टिभक्ति-सुधा मासिक–तंत्री प्रो.मगनलालशास्त्रीजी. (१३) शुद्धाद्वैत भक्तिमार्तंड मासिक–तंत्री श्री. वसंतराम शास्त्रीजी. (१४) शुद्धाद्वैत तत्त्वज्ञान भा. १–श्री. पटवारीजी (१५) आत्मनिवेदन अने लायबल समीक्षा केसनी श्री. पटवारीजी (१६) पुष्टिमार्गो-पदेशका भा. १–२ श्री. चिमनलाल शास्त्रीजी.



# अनुक्रमाणिका.





# सांक्षिप्त चिह्नांचा खुलासा.

| | |
|---|---|
| अ. प्र. | अंतःकरणप्रबोध. |
| ऋ. | ऋग्वेद |
| केनो. | केनोपनिषत् |
| गा. पं. | गाथापंचक |
| गी. | भगवद्गीता |
| गी. र. | गीतारहस्य |
| गो. शु. इ. | गोमांतक शुद्धीचा इतिहास |
| त. दी. नि. स. नि. प्र. | तत्वार्थदीपनिबंध सर्वनिर्णय प्रकरण |
| त. दी. नि. शा. प्र. | तत्वार्थदीपनिबंध शास्त्रार्थ प्रकरण |
| तृ. स्कं. सु. | तृतीय स्कंध सुबोधिनी |
| तै. उ. | तैत्तिरीयोपनिषत् |
| नि. ल. | निरोधलक्षण |
| दशमस्कंध पू. ता. फ. प्र. सुबोधिनी | दशमस्कंध पूर्वार्ध तामस फलप्रकरण सुबोधिनी |
| पु. म. | पुष्टिप्रवाहमर्यादाभेद |
| ब्रह्मविद्यो. | ब्रह्मविद्योपनिषत् |
| बृ. उ. | बृहदारण्यकोपनिषत् |
| भ. ह. नि. | भक्तिहेतुनिर्णय |
| भा. किंवा भाग | श्रीमद्भागवत |
| म. अश्व | श्रीमन्महाभारत अश्वपर्व |
| मनु. | मनुस्मृति |
| म. शा. | श्रीमन्महाभारत शांतिपर्व |

| | |
|---|---|
| म. सां. इ. | महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास |
| मुक्तिको. | मुक्तिकोपनिषत् |
| मु. उ. | मुंडकोपनिषत् |
| मै. त्र्यु. | मैत्र्युपनिषत् किंवा मैत्रायण्युपनिषत् |
| वि. धै. आ. | विवेकधैर्याश्रय |
| वे. सू. | वेदान्तसूत्रे |
| शां. सू. | शांडिल्यसूत्रें |
| श्वे. उ. किंवा श्वेताश्वो. | श्वेताश्वरोपनिषत् |
| स. नि. प्र. | सर्वनिर्णय प्रकरण ( तत्वार्थदीपनिबंध ) |
| स. स्तो. | सर्वोत्तमस्तोत्र |
| सि. मु. | सिद्धातमुक्तावली. |
| सि. र. | सिद्धांतरहस्य. |

—o—

# पुष्टिमार्गीय-सिद्धान्तरत्नहार



## रत्न १ लें



### पुष्टिमार्गाचा ओनामा.



**( १ ) ईश्वरप्राप्ति हेंच हिंदुधर्माचें अंतिमसाध्य होय—**

या जगांत मनुष्य सुखप्राप्तीसाठीं जीवापाड धडपड करीत असतो, व त्यांतच तो मग्न असतो; परंतु त्याला समाधानकारक सुख लाभत नाहीं; त्याचें दुःख नाहींसें होत नाहीं. तेव्हां ' खरें सुख कोणतें असावें, जें मिळविल्यानें संसारांतील पुनः पुनः जनन-मरणाच्या क्लेशदायक फेऱ्यांतून प्राणी मुक्त होईल ? ' असा हा प्रश्न साहजिकच विचारी मनुष्याच्या मनांत घोळत असतो, यासाठींच आमच्या ऋषिवर्यांनीं जन्म-जन्मांतरींचीं हजारों वर्षे या प्रश्नाचा विचार करण्यांत घालविलीं. ऐहिक ऐश्वर्य त्यांना परिपूर्ण मिळालें होतें; पण त्यामुळें उन्मत्त न होतां त्यांनीं आपल्या दृष्टि अंतर्मुख केल्या, व ' मनुष्याचें अंतिम साध्य काय असावें ? ' या प्रश्नाचें उत्तर शोधून काढून निर्भयपणें व आत्मविश्वासानें उपनिषदांच्या द्वारा तें लोकापुढें मांडून, जगांतील अद्वितीय **तत्त्वज्ञान** जन्मास आणलें.

" जगांतील आत्यंतिक दुःखाची निवृत्ति होऊन शाश्वत सुखशांति साध्य करून घेण्यासाठीं परमात्मप्राप्तीविना अन्य उपाय नाहीं, **नान्यः पन्था विद्यतेऽयनाय ।** " ( श्वेताश्वो. ३।८+६।१५ ) '(ज्याच्या प्राप्तीपलीकडे अन्य कोणताहि लाभ असूं शकत नाहीं;—

**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः।"** (गी. ६–२२) "ज्याचें सान्निध्य प्राप्त झाल्यावर कितीहि दुःखपरंपरांचा वर्षाव झाला तरी चित्त कंपायमान होऊं शकत नाहीं,–**यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणाऽपि विचाल्यते।"** (गी. ६–२२) "ज्या पदाला गेलें असतां प्राणी पुनरपि परत येत नाहीं, तें परमस्थान माझें आहे –**यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम।"** (गी. १५–६) त्या परमपदाची प्राप्ति हेंच हिंदुधर्माचें अंतिम साध्य होय, व हेंच परमावधीचें शाश्वत सुख होय. अशा सुखाला वेद 'श्रेयः' शब्दानें संबोधितात. "एतदर्थ शास्त्रांत कर्म, भक्ति व ज्ञान हे तीन उपाय सुचविले आहेत. याखेरीज श्रेयस्साधनासाठीं अन्य कोणताहि उपाय नाहीं." असें भागवताच्या एकादशस्कंधांत भगवान् श्रीकृष्णांनीं उद्धवाला उपदेशिलें आहे.

जसें एकाद्या सुंदर उद्यानांत एकाद्या आम्रवृक्षावर एकच मधुर व परिपक्व असें रसाळ फळ आलें असावें, व तें मिळविण्यासाठीं अनेक मनुष्यें, कोणी या शाखेनें तर कोणी त्या शाखेनें त्या फलाच्या समीप जाऊन त्याच्या रसाचा आस्वाद मिळविण्याचा आटोकाट प्रयत्न करीत असतात. त्या आम्रफलाची प्राप्ति व्हावी हेंच जसें सर्वांचें ध्येय असतें, त्याप्रमाणें "**रसो वै सः, यं लब्ध्वाऽऽनन्दी भवति**" या श्रुत्युक्तीप्रमाणें भगवान् उपर्युक्त फलस्वरूपी आहे, व तत्प्राप्त्यर्थ हिंदुधर्मांतर्गत अनेक संप्रदायरूप शाखाद्वारा तत्पदप्राप्तीची उत्कट इच्छा धरणारे मनुष्य प्रयत्न करीत असतात. ज्याला जसें सुगम व सोपें होईल, त्याप्रमाणें तो त्या शाखेनें (संप्रदायानें) वर चढून तें भगवत्स्वरूपि आम्रफल प्राप्त करून घेत असतो. म्हणून ते कर्म, भक्ति व ज्ञान, या मार्गांनीं आपआपल्या परीनें अंतिम शिखर गांठण्याचा प्रयत्न करीत असतात.

**भक्त्याऽहमेकया ग्राह्यः श्रद्धयाऽऽत्मा प्रियः सताम् ।**
**भक्तिः पुनाति मन्निष्ठा श्वपाकानपि सम्भवात्॥** (भा.११-१४-२१)

भगवान् म्हणतात--"हे उद्धवा! मी आस्तिक्यबुद्धीनें व केवळ भक्तीनेंच वश होतों. फक्त माझी तीव्र भक्तीच मला साध्य करूं शकते. मग तो चांडालादि हीनकुळांत जन्मला असला तरी माझी भक्तीच त्याला पवित्र करते." असें भागवतादि ग्रंथांतून भक्तिमार्गाचें श्रेष्ठत्व गाइलें आहे; परंतु देशकाल--परिस्थित्यनुरूप कधीं ज्ञानाला तर कधीं भक्तीला आणि कधीं कर्मालाच महत्त्व प्राप्त झालेलें दिसून येतें, व त्याप्रमाणें प्रत्येक आचार्यवर्यांनीं आपले सिद्धांत प्रतिपादन केले; परंतु यावरून केवळ वल्लभाचार्यांनींच खरे सिद्धांत जगासमोर मांडले. इतर पंथीयांचे सिद्धांत खोटे असें म्हणणें योग्य होणार नाहीं. हा केवळ सांप्रदायिक आग्रह आहे. हिंदुधर्मांत अनेक पंथाचा सुकाळ असून त्यांच्या तत्त्वज्ञानांत आणि सिद्धांतांत थोडासा फरक असला तरी परस्परांविषयीं वैमनस्य येण्यासारखें बिलकुल कारण नाहीं. उलट परमताबद्दल सहिष्णुताच दाखविली आहे. शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, निंबार्काचार्य आणि वल्लभाचार्य, यांनीं परमतांचें खंडन केलें आहे खरें; परंतु त्यांत द्वेषानें इतर आचार्यांचें दोषाविष्करण केलेलें आढळून येत नाहीं. हे सर्व आचार्य एकाच धर्मनिर्णयावर आलेले आहेत.

जगांत जर अत्यंत प्रभावशाली व ओजस्वी तत्त्वज्ञानाची परमोच्च सीमा गांठणारा धर्म असेल तर तो वेदांतावर अधिष्ठित असलेला हिंदुधर्मच होय. वरील आचार्यांचे अनुभव जरी भिन्न भिन्न असले तरी निर्णय व फल एकच; तें हें कीं, या धर्माचें ध्येय ईश्वरप्राप्ति करून घेणें हें होय.

वरील सर्व आचार्यांमध्यें श्रीवल्लभाचार्य हे शेवटचे आचार्य होत. यांनीं या सर्वांच्या वाङ्मयाचें व संप्रदायाचें सूक्ष्म परिशीलन केलें

व सर्व भाष्यांचा अभ्यास केल्यानंतर त्यांना असें आढळून आलें कीं, या "प्रत्येक संप्रदायानें ईश्वरप्राप्ति होणें शक्य असलें तरी कष्ट-साध्य आहे; तेव्हां आपण वेदांतावरच अधिष्ठित असलेली अन्य शाखा शोधून काढिली पाहिजे; जेणेंकरून ती शाखा सर्वांस आपलें ध्येय गांठण्यास सुलभ जाईल." खरोखर या सर्व आचार्यांनी प्राणिमात्राच्या कल्याणार्थ अति परिश्रम करून जे मार्ग शोधून काढिले त्याबद्दल त्यांच्या उपकारांचें कधींहि विस्मरण होणार नाहीं; परंतु भारतीय तत्त्वसृष्टींत इतर आचार्यांपेक्षां श्रीवल्लभाचार्यांनीं शोधन केलेला मार्ग कसा त्रिकालाबाधित, उच्चतम, लाभदायक व ईश्वर-प्राप्ति होण्यास सोपा आहे, हें दर्शविण्याचा येथें अल्प प्रयत्न कर-ण्यांत आलेला आहे.

श्रीमद्वल्लभाचार्य आपल्या तत्त्वार्थदीपनिबंधाच्या सर्वनिर्णय प्रकर-णांत आज्ञा करितात कीं–

**वर्णाश्रमवतां धर्मे मुख्ये नष्टे छलेन तु ।**
**क्रियमाणे न धर्मः स्यादतस्तस्मान्न मोचनम् ॥**

( त. दी. नि. ) स. नि. प्र. का. २२१.

अर्थात् "वर्णाश्रमाचें आचरण करणाऱ्यांचा मुख्य धर्म नष्ट झाला आहे व जो हल्लीं नाममात्रानेंच अस्तित्वांत आहे, तो जर आपण छलानें, जबरीनें किंवा कपटानें आचरणांत आणूं, तर तें धर्माचरण होणार नाहीं, व त्यापासून जीवाला मुक्ति मिळणें असंभवनीय आहे." या कारिकेच्या प्रकाशांत ते म्हणतातः–

**'यज्ञवेदादीनां कालवशादसाधकत्वं ज्ञातं तदाऽयं मार्गो भगवता कथितः । तेनेदानीं नान्यो मार्गः फलाय ।'**

( पृ. ४१० विद्याविलास प्रेस–मुद्रित )

या कलिकालामुळें वेदाध्ययन व वेदोक्त पद्धतीनें यज्ञादिककर्में करणें अत्यंत कठीण व तीं यथासांग न झाल्यास फलसिद्धिहि

होणें अशक्य असा अनुभव येतो, म्हणून प्रभूनें स्वयं हा मार्ग कथन केला आहे. हल्लीं अभीष्ट फलप्राप्तीसाठीं या मार्गाखेरीज अन्य कोणताहि मार्ग नाहीं; कारण "कलियुगांत इतर मार्गांनीं फलप्राप्ति होत असली तरी ती अत्यंत कष्टसाध्य आहे.

**कलौ भक्त्यादिमार्गा हि दुःसाध्या इति मे मतिः" ॥१७॥**

( वि. धै. आ. ).

तसेंच या कलियुगांत वेदोक्त कर्म करणें पण अशक्य झालें आहे. त्या कर्माचें आचरण इतकें कडक असतें कीं, यज्ञयागांत यत्किंचित् जर चूक झाली तर तें कर्म फलरूप होऊं शकत नाहीं. अशा परिस्थितींत मानव जातीवर परम कृपा करून आपल्याला शरण जाण्याचा व आपल्या कृपेची प्रार्थना करण्याचा, हा मार्ग भगवंतांनीं स्वयं कथन केला.

**( २ ) प्रभुकृपेची प्रार्थनाः—**

भक्तिमार्ग सर्वांपेक्षां सरल व सोपा धर्म खरा, परंतु तोसुद्धां या कलियुगांत आचरणें कठीण झालें आहे व ती भक्ति केवळ त्याच्या अनुग्रहानेंच-कृपेनेंच-लभ्य आहे, **'तदनुग्राहैकलभ्यां भक्तिम्।'** ( भ. ह. नि. ) असें श्रीवल्लभाचार्यांचें म्हणणें आहे; कारण कोणताहि मार्ग असला तरी प्रभूचे ठिकाणीं एकाग्र चित्त लावणें व वासनाक्षय करणें हें आवश्यक आहे, पण तें अत्यंत अवघड कार्य आहे. तें साध्य करून घेण्यास ईश्वरी कृपेचीच प्रार्थना करावयास हवी. त्याचा अनुग्रह झाल्याशिवाय हें संसारदुःख नाहींसें होत नाहीं. यांतून जर सुटका करून घ्यावयाची असेल तर भगवत्कृपेचाच मार्ग स्वीकारणें आवश्यक आहे. त्याच्या कृपेखेरीज सर्व व्यर्थ होय. मनुष्य संकटसमयीं त्याच्या कृपेचीच आराधना करितो. तो कितीहि ज्ञानी असो कर्मयोगी असो वा संन्यासी असो, शेवटीं त्याला प्रभुकृपेचीच

आराधना करावी लागते. वेदांत सुद्धां त्या कृपेची प्राप्ति होण्याकरितांच प्रभूची आराधना किंवा प्रार्थना करण्यांत आलेली आहे. एवढेंच नाहीं; परंतु प्रभुकृपेनेंच या चराचर सृष्टीचा कार्यक्रम चालला आहे. "**प्रसादाद् ब्रह्मणस्तस्य विष्णोरद्भुतकर्मणः** । ( ब्रह्मविद्यो. २ ) अर्थात् अद्भुत लीला करणाऱ्या श्रीकृष्णाच्या अनुग्रहानेंच सर्व होत आहे." तसेंच "**योगैश्वर्यंच कैवल्यं जायते यत्प्रसादात्** । ज्याच्या कृपाप्रसादानें ज्यांत योगांचें ऐश्वर्य साठविलें आहे अशा मोक्षाची प्राप्ति होते." असा स्पष्ट उल्लेख आहे.

त्याचप्रमाणें गीतेंत अठराव्या अध्यायांत भगवान् श्रीकृष्ण म्हणतातः—"**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम्** । (गी. १८।५६) माझ्या अनुग्रहानें शाश्वत व अव्यय स्थान (मोक्षपद) त्याला प्राप्त होतें." "**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि** । (१८–५८) अर्जुना, माझ्या ठायीं चित्त स्थिर ठेविलेंस म्हणजे तूं माझ्या अनुग्रहानें सर्व संकटें तरून जाशील, असें भगवंतांनीं अर्जुनास उद्देशून सर्वांस अभय वचन दिलें आहे. तसेंच भागवतांतून जे भगवदनुग्रहाची महत्ता दर्शवितात असे 'मदनुगृहीत' ' मदनुग्रह ' वगैरे अनेक शब्द उद्धृत करितां येतील.

केवळ आपल्या वेद, उपनिषद् , गीता व भागवत इत्यादि सामर्थ्यवान् धर्मग्रंथांतून परब्रह्म परमेश्वराची कृपाप्रार्थना करण्यांत आली आहे असें नाहीं. इतरहि सर्व धर्मग्रंथांतून प्रभुकृपेची प्रार्थना केलेली आढळते. म्हणून श्रीवल्लभाचार्यांनीं आपल्या संप्रदायांत प्रभुकृपाप्राप्तीला विशेष प्राधान्य दिलें आहे. "**कृपा हि सर्वतोऽधिका...** ( दशमस्कंध पू. ता. फ. प्र. सुबोधिनी अ. २६ पृ ४३ पं १३ ) प्रभूची कृपा सर्वांपेक्षां अधिक आहे."

सारांश, ईश्वरानुग्रहाखेरीज, त्याच्या सहानुभूतीखेरीज, त्याच्या कृपेखेरीज, त्याच्या पुष्टिखेरीज त्याची प्राप्ति होणें व शाश्वत सुख मिळणें शक्य नाहीं. कोणतेंहि कार्य फलीभूत होण्यास ईश्वराचें साहाय्य

किंवा पुष्टि ही पाहिजेच. हें एकवेळां ठरल्यानंतर श्रीवल्लभाचार्यांनीं आपल्या मार्गाची मुहूर्तमेढ प्रभुकृपेच्या शुद्ध पायावर रोविली; म्हणून त्यांच्या या मार्गाला ' **पुष्टिमार्ग** ' असें म्हणतात.

## ( ३ ) पुष्टिमार्ग म्हणजे काय ?

' पुष्टिमार्ग ' यांतील ' पुष्टि ' शब्द ' **पुष्**–पोषणें ' या धातूपासून झालेला आहे. भागवतांत पोषणाचा अर्थ "**पोषणं तदनुग्रहः**" ( भा. २-१०-४ ) अनुग्रह किंवा कृपा असा करण्यांत आलेला आहे. म्हणून पुष्टीचे पर्याय शब्द ' अनुग्रह ' किंवा ' कृपा ' हे होत.

**पुष्टि**शब्दाचा असा साधा व उदात्त अर्थ होत असतां पुष्टिमार्गाच्या आक्षेपकांनीं याचा अगदी विपरीत अर्थ करून ठेविला आहे. ते म्हणतात–या मार्गांतील कित्येक महाराजांचें व त्यांच्या अनुयायांचे विलास पाहतां ' पुष्टि ' म्हणजे शरीराचें पोषण, खाणें, पिणें, पुष्ट होणें, चैन करणें व अनेक सुंदर स्त्रियांबरोबर यथेच्छ भोगविलास करणें, हाच अर्थ करणें योग्य आहे; म्हणून याला पुष्टिमार्ग म्हणतात; "तथापि त्यांचें हें म्हणणें व्यक्तिगत दोषाला उद्देशून आहे. तेव्हां या विपरीत अर्थाचें खापर या संप्रदायाच्या माथ्यावर कोणी फोडूं लागलें तर तें सयुक्तिक होणार नाहीं; कारण, हा व्यक्तिगत दोष आहे. तो धर्मतत्त्वाचा दोष नसून त्या तत्त्वाच्या वास्तविक स्वरूपाचा विसर पडलेल्या किंवा पाडलेल्या त्या धर्माच्या अनुयायांचा आहे. अशी वस्तुस्थिति असतां, कांहीं पंथानुयायांत ' आपलाच पंथ खरा ' असा अभिनिवेश किंवा दुराग्रह उत्पन्न होतो, व त्याबरोबर इतरांचा दीर्घद्वेष व मत्सर करण्याची प्रवृत्ति बळावते. या पंथाभिनिवेशानें व मनोबुद्धीच्या क्षुद्र संकोचितपणामुळेंच, परमताबद्दल ' असहिष्णुता ' हा रोग मनुष्यास जडतो आणि त्या रोगाच्या लहरींतच वाटेल तसे अनर्थोत्पातमूलक अर्थ करून इतर संप्रदायांना कमी लेखण्याचा सतत प्रयत्न चालू असतो." ( गो. शु. इ. )

'पुष्टि' म्हणजे खाणें, पिणें व मजा मारणें यांतच जर श्रीवल्लभाचार्यांनीं परम कल्याण मानलें असतें, तर त्यांनीं खुशाल एकादा भव्य राजवाडा बांधला असता व राजाप्रमाणें राजवैभव भोगलें असतें. इतके ते ऐश्वर्यसंपन्न होते. मग पुष्टिमार्गाचा प्रचार करण्याची त्यांना जरूर भासली नसती. असें जर असतें तर त्यांनीं आपल्या त. दी. नि. शास्त्रार्थ प्रकरणांत—

**" वैराग्यं सांख्ययोगौ च तपो भक्तिश्च केशवे ॥**
**पंचपर्वेति विद्येयं यया विद्वान् (विमुच्यते) हरिं विशेत् ॥४९॥**

( त. दी. नि. शा. प्र. )

"विद्वानांत वैराग्य, सांख्य, योग, तप व केशवाची भक्ति हीं विद्येचीं पांच पर्वे आहेत. हिलाच पञ्चपर्वा विद्या म्हणतात. या विद्येनें विद्वान् श्रीहरींत लीन होतो." असें कां सांगितलें असतें? तसेंच त्यांच्या संन्यासनिर्णय, सुबोधिनी आदि ग्रंथांतून विषयांचा त्यागच त्यांनीं दर्शविला आहे. " **विषयाक्रान्तदेहानां नावेशः सर्वदा हरेः** ॥६॥ (संन्यास निर्णय) ज्यांचे देह व प्राण विषयांनीं व्याप्त झाले आहेत, त्यांच्यांत दुःखहरणशील परात्पर श्रीहरीचा आवेश सर्वथा होत नाहीं." ते सुबोधिनींत आज्ञा करितात कीं—" **कामादीनामशिथिलत्वे भक्तिर्नोत्पत्स्यते** । जोंपर्यंत कामादि दोष शिथिल होत नाहींत तोंपर्यंत भगवद्भक्ति उत्पन्न होत नाहीं." कामानें चित्त विषयाविष्ट होतें. " **विषयाविष्टचित्तानां विष्ण्वावेशः सुदूरतः** । विषयाविष्ट म्हणजे कामलोलुप पुरुषापासून विष्णुभगवान् दूर रहात असतात;" म्हणून त्यांनीं आपल्या मार्गांत कामाला स्थानच दिलेलें नाहीं. वास्तविक कामविषयक गोष्टीचा कोठेंहि निर्देश केलेला नाहीं. ठिकठिकाणीं त्यापासून दूर रहाण्याचाच उपदेश केलेला आढळून येतो.

तेव्हां ज्या आक्षेपकाना या संप्रदायांत विषयासक्तीचे ढग आढळतात; त्यांचें हें पाहाणें भ्रांतिमूलक व द्वेषप्रेरित आहे. व अशा भ्रांतिमय टीकाधारें ज्यांना या संप्रदायाचा गंध सुद्धां नाहीं, असे परस्थ पाश्चात्य विद्वान् पुष्टिमार्गाचा अर्थ विपरीत करतील यांत त्यांचा तरी दोष तो कोणता ?

जेम्स हेस्टिंग्ज साहेब आपल्या ग्रंथांत म्हणतात कीं—"His followers are the Epicureans of the East, and frankly avow their belief that the ideal life consists in social enjoyment (*pustimarga*, 'the primrose path of dalliance.') rather than in solitude and self-mortification ("Encyclopaedia of Religion and Ethics" edited by James Hestings Volume No 6 P. 705) [ वल्लभाचार्यांचे अनुयायी हे पूर्वेकडील "एपीक्यूरियन" ऊर्फ सुखात्मवादीच होत. ते उघडपणें असें म्हणतात कीं, जीविताचें ध्येय सुखासीनता हेंच होय. पुष्टिमार्ग हा एकांतवास आणि आत्मत्याग यांचा मार्ग नसून तो देहाचे भोग भोगण्याचाच मार्ग आहे. ]

परंतु मॉनियर वुइल्यम साहेब पुष्टिमार्गाच्या अर्थाचा उल्लेख करितांना खालील प्रमाणें म्हणतातः—Vallabha's view of the vaishnavas' creed has been called Pusti-marga, the way of eating, drinking and enjoying oneself. But in real fact he simply discountenanced asceticism as a mode of commending man to God. He maintained that worship of the diety ought not to be accompanied with fasting and self-mortification, because every individual soul was a portion of the supreme soul, and every man ought to reverence therefore,

and even foster, his own body which contained it ("Branism and Hinduism" by Monier Williams p.135)

[ वल्लभाचार्यांच्या वैष्णवपंथाला पुष्टिमार्ग म्हणजे खाणें, पिणें आणि मजा मारण्याचा मार्ग असें म्हणतात; पण त्यांनीं खरोखर सांगितले आहे तें एवढेंच कीं, मनुष्य आणि देव यांचें ऐक्य होण्याला संन्यासमार्ग त्याज्य आहे. उपासतापास, आणि आत्मत्याग, यांचा देवाच्या भक्तीशीं संबंध जोडणें योग्य नाहीं, असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे; कारण प्रत्येक व्यक्तिगत आत्मा हा परमात्म्याचाच अंश असल्यामुळें, तो अंश ज्या देहांत वास्तव्य करतो त्या आपल्या देहाला पवित्र मानून त्याचें पोषण करणें हेंच प्रत्येकाचें कर्तव्य आहे. ]

वस्तुतः हा पुष्टिमार्ग भोगविलासासाठी रचलेला नसून वैराग्याचें, पण वैराग्य जो विरहरस त्या रसावर रचलेला आहे. पंडित गट्टूलालजी आपल्या ग्रंथांत—

**"त्र्यम्बकं यजामहे सुगन्धिं पुष्टिवर्धनं"** (ऋग्वेद ७-५९-१२) त्रिकालज्ञ किंवा ( त्रि अंब कं ) तीन प्रकारचें संरक्षण करणाऱ्या, सर्वांचें पोषण करणाऱ्या व (सुगंधिं) ज्याचा यशोरूप सुगंध सर्वत्र पसरला आहे त्या ईश्वराचें आम्ही सर्व मिळून ( यजामहे ) पूजन करीत आहोंत." या श्रुतिवाक्यावर टीका करितांना ते 'पुष्टि' शब्दाचा खालील प्रमाणें अर्थ करतात: —

**" पुष्टीति पुष्टिमार्गाख्यसम्प्रदायस्य सर्वत्र प्रवर्तनेन वृद्धिकर्तारम् । अत्रापि हेतुः–त्र्यम्बकमिति । अर्थात् त्रिकालज्ञमिति । न चात्र पुष्टिशब्देन शरीरादिपोषणं ग्राह्यम् ।"**—( सत्सिद्धांत मार्तंड पृ. १८२. ) अर्थात् पुष्टि म्हणजे स्थूल शरीराचें पोषण नसून पूर्ण पुरुषोत्तमाचा अनुग्रह, व हा अनुग्रह ज्या मार्गांत होतो त्या मार्गाला

**पुष्टिमार्ग** असें म्हणतात. किंवा ज्या संप्रदायांत जीवाचें **सर्वश्रेय** भगवदनुग्रहानेंच होतें त्याचें नांव **पुष्टिसंप्रदाय** ! "

तसेंच तेराव्या शतकांत झालेल्या बोपदेवानें भागवतावर लिहिलेल्या ' **हरिलीला** ' या ग्रंथांत पुष्टिशब्द ' प्रभुकृपा ' या **अर्थीच** योजिला आहे. **'षष्ठ एकोनविंशत्या पुष्टिः सानुग्रहो हरेः ।'** भागवताच्या सहाव्या स्कंधांत एकोणिसाव्या अध्यायाच्या टीकेच्या प्रारंभीं श्रीधराचार्यांनीं भगवंताच्या अनुग्रहरूप पुष्टीचें वर्णन आलेलें आहे.

आतां श्रीवल्लभाचार्यांनीं आपल्या ग्रंथांतून ' पुष्टि ' शब्द कोणत्या अर्थानें वापरला तें पाहूं—

(१) **कृष्णानुग्रहरूपा हि पुष्टिः** ( त. दी. नि. )
श्रीकृष्णाचा अनुग्रह सम्पादन करणें हीच पुष्टि होय.

(२) **अनुग्रहः पुष्टिमार्गे नियामक इति स्थितिः॥१८॥**(सि.मु.)
पुष्टिमार्गांत प्रभूचा अनुग्रह नियामक ( Restraining, guiding ) आहे.

(३) **भक्तिमार्गस्य कथनात् पुष्टिरस्तीति निश्चयः॥२॥** (पु.म.)
भक्तिमार्गाच्या निरूपणानें भगवदनुग्रह ( पुष्टि ) होतो असें निश्चित आहे.

(४) **पुष्टिमार्गोऽनुग्रहैक साध्यः ।** ( अणुभाष्य )
पुष्टिमार्ग केवळ प्रभूच्या अनुग्रहानेंच साध्य होत असतो.

(५) **ममानुग्रहः फलसूचकः** (तृ. स्कं. सु. पृ. ५३ पं१८–९ )
माझा ( प्रभूचा ) अनुग्रह फलसूचक आहे.

' अनुग्रह ' हें पुष्टिमार्गाचें मूळ होय–पाया होय. या भरभक्कम पायावरच पुष्टिमार्गाची इमारत उभारली गेली आहे; व याच कार-

णास्तव डॉ. भाण्डारकरांनीं ' पुष्टिमार्ग ' याचा अर्थ " The Path of Divine Grace " असा केला आहे. अशा रीतीनें भगवदनुग्रहाची प्रबलता दर्शविणारा जो मार्ग, तो **पुष्टिमार्ग** होय. यावरून स्पष्ट होतें कीं, पुष्टिमार्गाचा सर्व आधार भगवंताच्या अनुग्रहावरच आहे. व ' पुष्टि ' शब्द परब्रह्म परमेश्वराच्या अनुग्रहार्थींच वापरला आहे, हें आतां सिद्ध झालें. ' पुष्टिमार्ग ' हा भगवत्कृपासाध्य मार्ग आहे, म्हणून भगवत्प्राप्तीसाठीं ज्या मार्गाचें अवलंबन करण्यांत येतें त्यास **पुष्टिमार्ग** असें म्हणतात.

गीतारहस्यांत लोकमान्य म्हणतात:–"कोणताहि संप्रदाय घेतला तरी त्याचे स्वभावतःच दोन भाग होतात. पहिला तत्त्वज्ञानाचा व दुसरा आचरणाचा. पहिल्यांत पिंडब्रह्मांडाच्या विचारांनीं परमेश्वरस्वरूप काय निष्पन्न होतें तें सांगून, मोक्ष कशाला म्हणावें याचा शास्त्रदृष्टया निर्णय केलेला असतो. व दुसऱ्यांत तो मोक्ष मिळविण्यास साधन किंवा उपाय म्हणून मनुष्यानें या जगांत कसें वागलें पाहिजे याचें निरूपण असतें. " सध्यां आपणास तत्त्वज्ञानाचा विचार कर्तव्य नसून आचार व व्यवहार यांचाच विचार करावयाचा आहे. **श्रीमच्छंकराचार्यांनीं** केवलाद्वैतसिद्धांत जगासमोर मांडल्यानंतर **श्रीरामानुजाचार्यांनीं** ' विशिष्टाद्वैत ' सिद्धांताचा विस्तार केला. तदनंतर **श्रीमध्वाचार्यांनीं** वरील सिद्धांताचें खंडन करून ' द्वैत ' सिद्धांताचें मंडन केलें. **श्रीनिंबार्काचार्यांच्या** तीक्ष्ण बुद्धीस तर वरील कोणतेहि सिद्धांत पसंत पडले नाहींत, म्हणून त्यांनीं 'द्वैताद्वैत' सिद्धांताचें प्रतिपादन केलें; व यावरील सर्व आचार्यांचे सर्व निर्णय नीट लक्षपूर्वक मनन करूनहि जेव्हां **श्रीवल्लभाचार्यांचें** समाधान झालें नाहीं, तेव्हां त्यांनीं ' शुद्धाद्वैत ' तत्त्वज्ञानप्रणाली अनुस्यूत केली. आचारव्यवहाराचा विचार करितांना प्रत्येक मार्गाचें सूक्ष्म व मार्मिक निरीक्षण करून देशकालपरिस्थित्यनुसार त्यांचा या मार्गांत कसा

समावेश होतो, हें त्यांनीं आपल्या पुष्टिमार्गांत दर्शविलें. या सर्व मार्गांचा कौशल्यानें एकाच मार्गांत समावेश करणें हें पांडित्याचें, अतुल चातुर्याचें व अलौकिक बुद्धीमत्तेचें काम आहे. प्रस्थानचतुष्टयांतील (वेद, गीता, ब्रह्मसूत्र व भागवत यांतील) अमोल तत्त्वमौक्तिकें वेंचून व त्यांना कसलेल्या निष्णात जवाहिऱ्याप्रमाणें जनसमाजापुढें शृंगारपूर्वक मांडून त्यांनीं प्रेमानें तें लुटण्यास मुभा दिली आहे; व या पुष्टिमार्गांतील सिद्धांतरत्नांची सर्वांना पारख करतां यावी म्हणून त्यांनीं ईश्वरी अनुग्रह संपादन करण्याचा लोकांना उपदेश केला, व तो उपदेश, व ती आचारप्रणालिका, यांचा या पुस्तकाच्या पुढील सिद्धांतरत्नांतून प्रकाश पाडण्यांत आलेला आहे.



# रत्न २ रें.

## शरणमंत्र.

**वेदवाक्ये महावाक्यं पुराणे भारते तथा ।**
**श्रीमद्वल्लभवाक्यार्थं श्रीकृष्णः शरणं मम ॥**

[ अष्टाक्षर निरूपण—श्रीविठ्ठलेश्वर ]

श्रीमद्वल्लभाचार्यांच्या वचनांचा अर्थ '**श्रीकृष्णः शरणं मम**' असा होतो; व हें वाक्य वेदवचनांत, पुराणांत, तसेंच महाभारतांत **महावाक्य** आहे.

**(४) ' श्रीकृष्णः शरणं मम ' हा एक महा मंत्र होयः—**

वेदकालीं आर्यलोक परमेश्वराची प्रार्थना वेदांतील मंत्रोच्चारानें करीत असत. या मंत्रावर त्यांची अढळ श्रद्धा होती. मंत्रांच्या प्रभावानें त्यांना वाटेल ती सिद्धि प्राप्त होत असे. अनुकूल पाऊस, धनधान्यांची विपुलता व अनेक प्रकारच्या सिद्धी, या सर्व गोष्टी संकटसमयीं ते मंत्रसामर्थ्यानें मिळवीत असत; परंतु कालांतरानें अनधिकारी पुरुष त्या वेदमंत्राचा उपयोग क्षुल्लक बाबींकडे करूं लागल्यामुळें, त्यांतील दिव्य तेज व दिव्य सामर्थ्य दिवसेंदिवस नष्ट होऊं लागलें. पुढें पुढें तर त्या मत्रांचा उपयोग जारणमारणाकडे होऊं लागला; यामुळें त्या मंत्रांचें पावित्र्य व सामर्थ्य कमी कमी होऊं लागलें व त्याचें तंत्रविद्येंत रूपांतर झालें. तंत्रविद्येंत, जादुटोणे वगैरे करण्याचीं अनेक पुस्तकें लिहिलीं गेलीं. कांहीं कालपर्यंत या तंत्रविद्येचें प्राबल्य टिकलें; परंतु लोकांना समजूं लागल्यानंतर त्यावर अविश्वास वाटूं लागला. कारण त्यांत फसवेगिरी किंवा लुच्चेगिरी यांचेंच प्राधान्य विशेष होऊन, ही विद्या हलक्या दर्जाच्या लोकांकडे आल्यामुळें

तिचा दुरुपयोग होऊं लागला. यामुळें तिचा लवकरच लोप झाला. आतां मंत्र व तंत्र या दोन्ही विद्या लुप्त होऊन 'यंत्रयुग' सुरू झालें आहे. या युगांत तर ' आत्मा वगैरे सब झूठ आहे, ईश्वर म्हणून कोणी या जगाचा नियंता नाहीं, जग हें स्वयंभू आहे ' अशा विचारांची लाट पाश्चात्यांच्या जडवादानें पसरत आहे. या विचारांना वेळींच वेसण घालायला हवी म्हणून असा प्रयत्न श्रीवल्लभाचार्यांनीं पूर्वींसुद्धां आपल्या समयीं केलेला होता. तत्कालिन समयाचें वर्णन करितांना श्रीवल्लभाचार्य म्हणतात.—" जनता या कलियुगांत पाखंडी व खलधर्मी झाली आहे; त्यामुळें कर्मज्ञानादि मार्ग यथासांग सफल होत नाहींत. लोकांना 'कोणाचा आश्रय करावा' असा प्रश्न उद्भवला आहे. कोणत्या मार्गांनें गेलें असतां प्रभू आपलें रक्षण करील याची विवंचना त्यांस पडली आहे..."इत्यादि.कारण मुसलमान संस्कृति त्यावेळीं धुमाकूळ माजवीत होती. अशासमयीं श्रीवल्लभाचार्यांनीं जनतेस श्रीकृष्णाचा आश्रय घेण्याचा उपदेश असा केला आहे, कीं, 'त्या शरणागतवत्सल प्रभूला शरण जा. तोच तुमचें रक्षण करील. त्याच्याच मंत्राचें तुह्मी जपानुष्ठान करा. तो मंत्र म्हणजे ' **श्रीकृष्णः शरणं मम**' हा होय. अर्थात् 'श्रीकृष्ण म्हणजे श्रीसहित कृष्ण हा माझा शरणस्थ प्रभु आहे.' माझ्या निवाऱ्याचें—आरामाचें—घर आहे. माझा अखेरचा आधार व विसावा आहे.' या मंत्रांत जीं आठ अक्षरें दिसतात, त्या प्रत्येकाचा वल्लभ सांप्रदायिक ग्रंथकारांनीं सुंदर अर्थ दिला आहे; परंतु विस्तारभयास्तव आपणास खोलांत शिरण्याचें कारण नाहीं. सध्या वरील अर्थ घेतला व त्याप्रमाणें आपण आपली वागणूक ठेविली तरी पुरे आहे. सर्व वेदशास्त्रांतून या प्रभूलाच शरण जाण्याचा उपदेश केला आहे.

गीतेंत अठराव्या अध्यायांत जो सिद्धांत प्रतिपादन करण्यांत आलेला आहे, त्यालाच श्रीवल्लभाचार्यांनीं ' अग्रपूजे ' चा मान दिला

आहे. गीताशास्त्राबद्दल ते किती उच्च भावना दर्शवितात, तें पहा.— ‘ **एकं शास्त्रं देवकीपुत्रगीतम् ।** ’ या जगांत जर एकादें प्रधान शास्त्र असेल, तर तें देवकीच्या पुत्रानें म्हणजे भगवान् श्रीकृष्णांनीं गाइलेलें गीत होय. अर्थात् गीताशास्त्र सर्वश्रेष्ठ शास्त्र आहे; व या शास्त्राचा शेवट भगवंतांनीं निर्गुणभक्तिमार्गांत व शरणमार्गांत केला आहे.—“ **सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज।** (गी. १८-६६) सर्व धर्म म्हणजे मोक्षप्राप्तीचीं साधनें ( संपादन करण्याचा खटाटोप ) सोडून तूं मला एकट्यालाच ( परमेश्वरालाच ) शरण जा. ” या भगवदाज्ञेला श्रीवल्लभाचार्यांनीं या मंत्रानें मान्यता दर्शविली आहे. गीतेंतील वचनाप्रमाणेंच या मंत्राच्या अर्थाचें वचन **महानारायण** उपनिषदांत सांपडतें.

“ **हे जगत्पते कृष्ण, त्वामहं शरणं गतः ।** ” हे कृष्ण, मी तुला शरण आलों आहें. हे शब्द वरील अर्थाचेंच सूचन करितात. म्हणून या सांप्रदायाचा केंद्र महामंत्र ‘ **श्रीकृष्णः शरणं मम** ’ हा होय.

( ५ ) **उद्देशः—**

यज्ञादिक अन्य साधनें या कलियुगांत अत्यंत कष्टसाध्य असून, फलदायी होत नाहींत. तीं करण्यास अति कष्ट सहन करावे लागतात. बरें, ती केलीं तरी शाश्वत सुखाचा लाभ व चिरकाल शांति लाभत नाहीं. फक्त स्वर्गप्राप्ती होते. पण “ **क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति** ( गी. ९-२१ ) स्वर्गप्राप्तीकरितां केलेलें पुण्य स्वर्गांत भोग भोगून झाल्यावर तें पुण्य क्षीण होतें. तेव्हां मनुष्य पुनश्च या मर्त्यलोकांत जन्म घेतो. ” अशा परिस्थितींत सामान्य जनतेला या सुखाचा लाभ मिळावा म्हणून श्रीवल्लभाचार्यांनीं या शरण मंत्राचें दान केलें. पूर्वींच्या मंत्रांतील देवता नष्ट झाल्या होत्या. त्यांत ओजश्शक्ति राहिली नाहीं. तेव्हां **श्रीकृष्ण आचार्यरूपानें** प्रकट होऊन त्यांनीं सकल

जनाच्या उद्धारार्थ या मंत्राचा प्रसार करविला. हा भगवन्नामाचा मंत्र जो भेटेल त्याला देण्याचा त्यांनी सपाटा चालविला. कारण, भागवतकार म्हणतातः—

**ते सद्भाग्या मनुष्येषु कृतार्था नृप निश्चितम् ।**
**स्मृतिं स्मारयन्तीह हरेर्नाम कलौ युगे ॥**

"राजन् ! या कलियुगांत भगवन्नामस्मरण जे करतात, किंवा करवितात, ते या मानवांमध्यें मोठे भाग्यवान् व कृतार्थ झाले असें समज."

या मंत्राचा प्रसार करतांना केवळ '**श्रीकृष्णः शरणं मम**' '**श्रीकृष्णः शरणं मम**' म्हणत स्वस्थ बसण्याचा मार्गच काय तो एक श्रेष्ठ, हें एकदेशीय मत **श्रीवल्लभाचार्यांना** मान्य नव्हते; त्याचप्रमाणें त्यांनीं उपदेशहि केला आहे. केवळ या मंत्राचा जप केल्यानें भागत नसून त्यांच्या उपदेशाप्रमाणें तो पूर्ण कृतींत उतरला पाहिजे. केवळ या मंत्राचा जप करणारे वाचिक संन्यासी होत. या वाचिक संन्यासामुळेंच हिंदुस्थानांतील वैदिक धर्महि 'समूलं च विनश्यति' होण्याची वेळ आली होती; परंतु आचार्यांनी व इतर संतमंडळींनी भागवतधर्माचें पुनर्जीवन करून तो दुष्परिणाम टाळला. टिळेमाळा करून व हातांत मोठी जपमाला घेऊन 'मुखांत राम व बगलेंत सुरी' ठेवणारे तसेच 'राम नाम जपना और पराया माल अपना' अशा दृष्टीचे भोंदू, ढोंगी साधू व संन्यासी यांचा त्यावेळीं हल्लींप्रमाणेंच सुळसुळाट झाला होता. केवळ 'श्रीकृष्ण हेंच माझें शरण्य आहे.' असें म्हटल्यानें तें शरण्य सिद्ध होत नाही. तें सर्वस्वी मनानें अंतःकरणपूर्वक व्हावयास पाहिजे. तरच या मंत्राचा उपयोग. 'श्रीकृष्ण माझा आश्रय आहे—रक्षक आहे' केवळ ही भावना जागृत ठेवावी. हाच काय तो उद्देश या मंत्राचा आहे.

हा मंत्र साधु किंवा वैरागी होण्याचा उपदेश करीत नसून केवळ आपले कार्य करीत असतांना आचार्यांच्या उपदेशाप्रमाणें प्रभूशीं तादात्म्य होण्यासाठी आहे. म्हणून प्रत्येक वैष्णवानें या मंत्राचा निरंतर जप करून त्याप्रमाणें वागणूक ठेवावी.

प्रत्येकानें उत्तम भगवद्भक्त वैष्णवाकडून अगर योग्य गुरूकडून या मंत्राचा उपदेश घेऊन अर्थ समजून घ्यावा. अवैष्णवाकडून या मंत्राचें ग्रहण करूं नये. कारण—" **अवैष्णवाद्गृहीत्वा तु हरिभक्तिर्न वर्धते**—अवैष्णवापासून जर या मंत्राचे ग्रहण केले तर त्यायोगें हरिभक्तीची वाढ होत नाही." पूर्वी स्वप्नद्वारासुद्धां या मंत्राचे ग्रहण करीत असत; असे सांप्रदायिक दाखले हल्लीं उपलब्ध आहेत. दामोदरदास संभलवाले यांना प्रभूनें स्वप्नांतच आज्ञा केली की, " तुम्ही या मंत्राचें पुण्याहवाचन केल्यानंतर भगवन्नामग्रहण करा व शरणमंत्राचा जप सदोदित करा. " या जपाचा भाव अत्यंत गूढ आहे. प्रभूचें अंतःकरणपूर्वक मनांतल्या मनांत ध्यान करावें. अंतःकरणाची शुद्धि झाल्याशिवाय अहोरात्र प्रभुभजन केले तरी त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. दिवसा गीता भागवतादि महान् पवित्र ग्रंथ भक्तिपूर्वक वाचावे व रात्रीं पापकर्माला प्रवृत्त व्हावें हें अति निंद्य होय. अशा लोकांचे प्रभु कधींहि कल्याण करीत नाहीं. अशा लोकांच्या नशीबीं शेवटी नरकवासच असतो.

## ( ६ ) शरण महामंत्राचें माहात्म्यः—

हा अष्टाक्षर मंत्र आधुनिक कालांतील एक यज्ञच होय. प्राचीन कालीं यज्ञयाग करून देवाची उपासना करीत; परंतु आतां तें अशक्य झालें आहे. भगवंतांनीं सुद्धां गीतेत " **यज्ञानां जपयज्ञोऽस्मि** (गी. १०–२५ ) यज्ञापैकीं मी ' जपयज्ञ ' अर्थात् श्रेष्ठ यज्ञ " असें म्हटलें आहे. हें वाक्य महत्त्वाचें आहे. अनुगीतेंत ( म. अश्व. ४४।८ )

" **यज्ञानां हुतमुत्तमम्**—म्हणजे यज्ञामध्यें ( अग्नीत ) हवि समर्पण करून सिद्ध होणारा यज्ञ उत्तम, " असें म्हटलें आहे; व तेंच वैदिक कर्मकांडवाल्यांचें मत आहे; पण भक्तिमार्गांत हविर्यज्ञापेक्षां नाम-यज्ञाचें किंवा जपयज्ञाचें महत्त्व विशेष असल्यामुळे गीतेंत " **यज्ञानां जपयज्ञोऽस्मि** " हे वाक्य आलें आहे. " दुसरें कांही करो वा न करो, केवळ जपानेंच ब्राह्मण सिद्धि पावतो " असें मनूनेंहि एके टिकाणीं म्हटले आहे ( २-८७ ) ( गी. र. ७५८ ) कारण जेथें परमेश्वरच सर्व यज्ञांचा प्रभु व भोक्ता आहे. ( गी. ९-२४; ५-२९ म. शां. ३४० ) त्यालाच शरण गेलें म्हणजे सर्व इच्छित मिळवि-ल्यासारखें आहे, व यामुळेंच या संप्रदायाला ' शरणमार्ग ' असेंहि म्हटलेलें आहे. प्रभूच खरोखर मोक्षरूप आहे. म्हणून मोक्षाचें साधन साध्य करावयाचे तर श्रीकृष्णाला शरण जाणे हेंच होय. भक्ति-मार्गांत प्रभूचे शरण स्वीकारताना देश, काल व परिस्थिति बाधक होत नाहीत. हा कलिकाल दोषपरिपूर्ण आहे, म्हणून यापासून अलिप्त राहावयाचें असल्यास प्रभु म्हणतात—" **मामेकं शरणं व्रज** ( गी. १८—६६ ) मला एकट्यालाच तूं शरण ये. "

या संसारसिंधूंत मग्न झालेल्या मनुष्याला श्रीकृष्णाच्या आश्रया-खेरीज उत्तम व सुखप्रद आश्रय नाहीं. मग प्रभूस शरण जाणारा कोणीहि असो, साधु असो, वा असाधु असो, तो एकदा अनन्यभावें प्रभूला शरण गेला की, त्या प्रभूला सर्व त्याची काळजी असते. त्याचा योगक्षेम प्रभूच चालवित असतो. या भगवच्छरणांत सर्व पूजनअर्च-नाचा समावेश होतो. शास्त्रें जाणलीं, न जाणलीं तरी सारखींच; कारण या नामाचा जप केल्यानें परमात्म्याची गति प्राप्त होते; मनुष्य संसाराच्या ( जन्ममरणांच्या ) बंधनांतून मुक्त होतो. म्हणून एकहि क्षण व्यर्थ न घालवितां प्रभुनामाचा जप नेहमीं करावा. या योगाने कोणत्याहि मार्गांत अडथळे येत नाहीत. किंवा मनुष्य स्वकर्तव्या-

पासून च्युत होत नाही. प्रभूकडे नेहमी ध्यान असावें. प्रभु हा शरणागतवत्सल आहे. तो शरण आलेल्याचा उद्धारक आहे.

**( ७ ) एक सांप्रदायिक दृष्टान्तः—**

प्रभूच्या नामस्मरणानें एकणाराचें सुद्धा कल्याण कसें होतें. या विषयीं एक सांप्रदायिक कथा सांगण्यात येते. **श्रीवल्लभाचार्य** आपल्या शिष्यासमवेत अरण्यातून जात असता ते शिष्यांना म्हणाले कीं, सर्वांनी '**श्रीकृष्णः शरणं मम**' या मंत्राचा जप करीत करीत मार्ग आक्रमण करावा. या योगें तुम्ही संकटात सापडणार नाही. असें सांगण्याचें कारण कृष्णदास मेघन त्यांच्या शिष्यांना समजलें नाहीं; परंतु गुरूंची आज्ञा शिरसावंद्य म्हणून ते नेहमी जप करीत असत. एकदा **श्रीवल्लभाचार्यांनी** त्यांना भोजनपात्र आणण्यास सांगितलें. ते ते घेण्यास गेले असता त्यांना वाटेत वाघ दिसला. दोघांची दृष्टादृष्ट झाली. कृष्णदास मेघन यांची तर भीतीनें ताराबळ उडाली. काय करावें हे त्यांना समजेना. अशा परिस्थितीतहि त्यांचा भगवन्नामजप सुरूच होता. ते दोघेहि एका तळ्यावर आले. वाघ तृषार्त असल्यामुळें तो पोटभर पाणी प्याला व कृष्णदास मेघन तळ्याच्या दुसऱ्या टोकावर भितीनें स्वस्थ जप करीत उभे राहिले. त्या मंत्रोच्चारानें वाघ मंत्राधीन होऊन भगवन्नाम ऐकत उभा राहिला. व पुन्हा त्यानें जलप्राशन केलें. कृष्णदास मेघन यास याबद्दल आश्चर्य वाटलें. जेव्हा कृष्णदास मेघन तेथून हाललें, तेव्हाच वाघ तेथून परत फिरला. तो कोठें पळाला याचा सुगावा सुद्धा कृष्णदास मेघन यांना लागला नाहीं. ही सर्व हकीगत त्यांनी आपल्या गुरूंना निवेदन केली; तेव्हां गुरु म्हणाले, तिर्यक्प्राणीमात्रांना सुद्धां प्रभुगान आवडत असतें. तू प्रभुगान करणारा व वाघ श्रवण करणारा म्हणून तेथें दोघांचें तादात्म्य झालें. वाघाचे ठिकाणीं समभाव उत्पन्न झाल्यामुळें त्यानें तुझी हिंसा केली नाहीं.

मागें सांगितल्याप्रमाणें प्रभु नामस्मरण ऐकणाराचें सुद्धां कल्याण करितो तें असें. सारांश, जगांत जर एखादा सर्वश्रेष्ठ मंत्र असेल तर तो " **मन्त्रोऽप्येकः तस्य नामानि यानि ।** " फक्त एकच मंत्र **श्रीकृष्ण शरण** मम हा होय.

**किं मन्त्रैर्बहुभिर्विनश्वरफलैरायाससाध्यैर्मखैः**
**किञ्चिल्लोपविधानमात्रविफलैः संसारदुःखावहैः ।**
**एकः सन्नपि सर्वमन्त्रफलदो लोपादिदोषोज्झितः**
**'श्रीकृष्णः शरणं मम'ेति परमो मन्त्रोऽयमष्टाक्षरः ॥**

"जेथें एकच सर्व मंत्राचें फल देणारा, सर्वदोषरहित परम उत्तमोत्तम असा हा आठ अक्षरांचा '**श्रीकृष्णः शरणं मम**' मंत्र आहे. तेथें इतर कष्टसाध्य नाशवंत फलदायी अनेक मंत्राचा काय उपयोग? कारण यज्ञ जर विधिवत् न झाले तर निष्फल होतात. जें काम अनेक मन्त्रांनी होऊं शकत नाहीं तेंच काम या एका मन्त्रानें होतें, असें नारदपंचरात्रांत म्हटलें आहे. याच ग्रंथांत श्रीमहादेव पार्वतीला म्हणतात---हे पार्वती! श्रीकृष्णमन्त्राच्या उपासकांचें शुद्ध पादोदक सर्व तीर्थे व पृथ्वी यांनाहि पुनित करितें. असा हा सर्वश्रेष्ठ मंत्र होय. **श्रीविठ्ठलनाथजी** अष्टाक्षर निरूपणांत म्हणतात; **मन्त्राणां मन्त्रराजोत्तमोत्तमः** (१५) हा मंत्र सर्व वेदशास्त्रांचा सार होय. हा प्रभुमुखारविंदांतून प्रकट झालेला आहे. **श्रीमद्वल्लभाचार्यांनीं** संसाररूपी रोगावर रामबाण अशी ही अष्टाक्षरी मन्त्ररूपी अमृतवल्ली जनतेस दिली आहे. तिचा या रोगावर अढळ श्रद्धेनें उपचार केल्यास फलप्राप्ति अवश्य झालीच पाहिजे.

## (८) फलश्रुतिः—

**श्रीविठ्ठलनाथजींनीं** आपल्या 'अष्टाक्षरनिरूपण' ग्रंथांत या मंत्राची फलश्रुति फारच उत्तम सांगितली आहे. ते म्हणतात—" जो

**कोणी** या महा मंत्राचा जप करितो, तो भगवंताचें ठिकाणीं **रति**, भक्ति व वैराग्य मिळवितो. आणि त्या योगें भोग व मोक्ष हे दोन्ही हस्तगत होतात; सर्व रोगांची शांति होते; सर्व पापें नाश पावतात; वैभव घरीं नितात वास करितें. ऋद्धि व सिद्धि तेथें स्थिर होतात. ( श्लो. ९ व १० ) तो " **आनन्दं परमानन्दं सायुज्यं हरिवल्लभम्** । आनंद-परमानंद-स्वरूप श्रीहरी बरोबर सायुज्य मिळवितो " तो श्रीहरीस प्रिय होतो, या कारणास्तव **श्रीवल्लभाचार्य** आज्ञा करितात— "**अशक्ये वा सुशक्ये वा सर्वथा शरणं हरिः** ।। ११ ।। (वि. धै. आ.) कोणतीहि गोष्ट अशक्य असो किंवा शक्य असो त्यांत श्रीहरीचें अनुष्ठान पाहिजे. त्याचा आश्रय निरंतर पाहिजे."

**तस्मात् सर्वात्मना नित्यं श्रीकृष्णः शरणं मम ।**
**वदद्भिरेव सततं स्थेयमित्येव मे मतिः ।। ९ ।।** [नवरत्न]

" म्हणून सर्व काली व सर्व स्थली सर्वप्रकारें श्रीहरीला शरण जावें, असें माझें स्पष्ट मत आहे. सर्व चिंतेंतून मुक्त व्हावयाचें असल्यास सर्वदा सर्वात्मभावपूर्वक ' **श्रीकृष्णः शरणं मम** ' या मंत्राचा जप करावा. अगर तें करणें अशक्य असल्यास तो मंत्र श्रवण तरी करावा. " **भस्मी भवन्ति तस्याशु महापातकराशयः**—या मंत्रानें महापातकाच्या राशी सुद्धां नाहींशा होतात." मनुष्याचे अनिष्टस्थान-स्थित दुष्ट ग्रह नाहींसे होऊन ते अनुकूल होतात. यानें भूत प्रेत पिशाच इत्यादि बाधा होत नाहीं. एवढेंच काय ? परंतु मरणाचें सुद्धां याला भय नसतें मग इतरांची कथा काय ? " **अष्टाक्षरं जपेन्नित्यं यमो दृष्ट्वा हि शंकते**—या मंत्राच्या सामर्थ्यापुढें यमाचें सुद्धां कांहीं चालत नाहीं. म्हणून या अष्टाक्षरी मंत्राचा अवश्य जप करावा" या भगवन्नामरूपी शस्त्रापुढें इतर शस्त्रें फिक्कीं पडतात. असा भक्त

मरणाधीन न होतां त्याचें मरण त्याच्याच आधीन होतें, अर्थात् तो इच्छामरणी होतो. म्हणूनच तुकाराम महाराज म्हणतात "आपुलें मरण पाहिलें म्यां डोळा" ही योग्यता जर कशानें आली असेल तर केवल भगवंताच्या नामाचा सतत जप होय. त्यांना मरण म्हणजे एक खेळ वाटतो. मरणाची किंचित् देखील ते पर्वा करीत नाहींत व हें फल प्रभूवरील त्यांचें निःसीम प्रेमाचें द्योतकच समजलें पाहिजे.

या मंत्राचें स्मरण शुद्ध भावानें केलें पाहिजे, व तसें केल्यानेंच भक्ति उत्पन्न होते. या जपानें जीव स्वतःच्या अंशी प्रभुशीं ओळख करूं शकतो व सायुज्य मुक्ति प्राप्त करून घेतो. जीव पापी असो आणि त्यांत ज्ञान-भक्तीचा ओलावाही नसो, पण जर तो अनन्यभावें प्रभूस शरण गेला, तर त्यावर निश्चयपूर्वक प्रभूचा अनुग्रह होतो. या युगांत श्रीकृष्णाला निर्मल अंतःकरणानें शरण जाण्याशिवाय दुसरी सद्गति नाहीं. हरिभक्ति हीच श्रेयस्कर आहे. व हा भक्तिभाव उत्पन्न करण्यासाठींच या मंत्राचें निरूपण प्रथमारंभीं करावें लागलें. भक्तिबीज पेरण्यापूर्वीं ती जमीन सुपीक केली पाहिजे. आत्मनिवेदनास किंवा आत्मसमर्पणास त्याला अधिकारी केला पाहिजे व तो अधिकारी या मंत्रानें व श्रीचें शरण्य स्वीकारल्यानें होतो. दूध सापाला पाजलें तर तें विषमय होतें. तसेंच अनधिकारी पुरुषाला आत्मनिवेदनाचें ज्ञान दिल्यानें याचा परिणाम विकृत होतो. तसें होऊं नये म्हणून '**श्रीकृष्णः शरणं मम**' या मंत्राची प्रथम आवश्यकता आहे. तेव्हां या मंत्राचें महत्त्व म्हणजे भक्ताला अधिकारी बनविणें हेंच होय. जो या मंत्राचें रहस्य समजतो तो भक्तिमार्गाच्या उच्चभूमिकेंत प्रवेश करण्यास अधिकारी होतो. हा शरणधर्म सिद्ध झाल्यानंतर जीवानें प्रभूला आपलें सर्वस्वसमर्पण करावें. आतां हें समर्पण म्हणजे काय याचें पुढील रत्नांत विवेचन करण्यांत आलें आहे.

# रत्न ३ रें.

## आत्मनिवेदन.

### ( १ ) ईश्वरी साक्षात्कारः—

**श्रीवल्लभाचार्यांचे** समयीं अनेक पंथ व सम्प्रदाय उदयास आले होते, ते ' आपलाच मार्ग वेदप्रतिपादित आहे ' असें सांगूं लागले; तेव्हां भोळ्या परंतु श्रद्धाळू जनतेला त्यातला कोणता मार्ग पत्करावा याचा उलगडा करिता येईना. या परिस्थितीचा फायदा घेऊन मानभावासारखी वेदविरोधी पाखंडें याच काळी जन्मास आली. यामुळे त्यावेळीं जी धर्मग्लानि या भारतभूमींत झाली, ती सहन न झाल्यामुळें **श्रीवल्लभाचार्य** इतर पाखंडी मतावर तुटून पडले, व त्यानी भागवतधर्माचे संस्थापनकार्य हाती घेतलें. तत्कालीन दिङ्मूढ झालेली जनता पाहून त्यांना फार चिंता पडली. तेव्हां त्या चिंतेच्या निवारणार्थ साक्षात् आनन्दघन भगवान् श्रीकृष्ण श्रावण शुद्ध ११ ला प्रत्यक्ष प्रकट झाले व आचार्यांना आज्ञा केली की ' आत्मनिवेदनद्वारा सर्व प्राणिमात्र मला शरण येऊं द्या. मी त्याचे सर्व दोष नष्ट करीन.' नंतर प्रभूनें प्राणिमात्राला शरण येण्याबद्दल सर्व समर्पण मंत्राचें दान करून त्याची चिंता नाहींशी केली. या विषयी **श्रीवल्लभाचार्य** म्हणतातः—

**श्रावणस्यामले पक्ष एकादश्यां महानिशि ।**
**साक्षाद्भगवता प्रोक्तं तदक्षरश उच्यते ॥ १ ॥** [ सि. र. ]

"श्रावण महिन्याच्या शुक्लपक्षांत एकादशीच्या मध्यरात्रीं साक्षात् भगवंतांनीं प्रकट होऊन जें सांगितलें तें येथें अक्षरशः सांगितलें जात आहे."

हा भगवत्साक्षात्कार सकाळीं त्यांनी आपले शिष्य **दामोदरदास** त्यांना इत्थंभूत सांगितला. तो असा—"भक्तिमार्ग प्रकट करण्याची मला आज्ञा झाली आहे. ज्या जीवाला तुम्ही आत्मनिवेदनाचा उपदेश कराल त्याचा मी स्वीकार करीन; व त्याचे सेवेंत प्रतिबंध करणारे दोष मी दूर करीन." हें ऐकून **दामोदरदासानी** विनंती केली की "प्रभो! या मार्गाचा अनुयायी प्रथम मला बनवा; त्यायोगें मी पुनित होईन. जो संप्रदाय आपण लोकात प्रकट करणार आहात, त्याची मला अगोदर दीक्षा द्या." **श्रीवल्लभाचार्यानी** या विनंतीचा स्वीकार केला व दामोदरदास स्नानादिक कर्मे करून आल्यानंतर त्यांना त्यांनी प्रभुसमीप नेलें, व त्याच्या हातात तुलसीपत्र देऊन श्रीपुरुषोत्तमानें निवेदन केलेल्या गद्यमंत्राचे त्याना दान केलें. तो गद्यमंत्र असा:—

"हजारों वर्षांपासून मला कृष्णाचा वियोग झाला आहे. त्या कृष्णवियोगाच्या तापक्लेशामुळें माझ्या आनंदाचा तिरोभाव झाला आहे. माझा देह, प्राण, इंद्रिय, अंत:करण व त्याचे धर्म, दार, अगार, पुत्र, आप्त, वित्त, इहलोक, परलोक हे सर्व माझ्या आत्म्यासहित मी भगवान् श्रीकृष्णाला समर्पण करितों. मी दास आहें. हे श्रीकृष्ण! मी तुझाच आहें."

## ( १० ) साक्षात्काराविषयीं सत्यता:—

श्रावण शुद्ध ११ चे दिवशीं जो **श्रीवल्लभाचार्यांना** ईश्वरी साक्षात्कार झाला, त्याचें फल म्हणजे हा आत्मसमर्पणाचा भगवत्प्रोक्त मंत्र होय. '**साक्षाद्भगवता प्रोक्तं तदक्षरश उच्यते**' असें जें त्यांनीं सांगितलें त्याची सत्यता आमच्या धर्मसुधारक बंधूंना कदाचित् पटणार नाहीं. कारण दैवी साक्षात्कारानें आपली प्रतिष्ठा वाढविण्याचे स्तोम आमच्या हिंदूधर्मांत फार बळावले आहेत, असें ते

म्हणतील; परंतु या वल्लभीय संप्रदायांत असले कोणत्याहि प्रकारचें दैवी लचांड नाही. असें त्यांनीं थोडा विचार केल्यास कळून येईल. **श्रीवल्लभाचार्य** हे परम भगवद्भक्त ! निर्वाण-पदाला पोंचलेले स्थितप्रज्ञ !! हे ऐहिक लालसेनें आपल्या संप्रदायाची किंवा आपली प्रतिष्ठा वाढवावी म्हणून 'मला ईश्वरी साक्षात्कार झाला' असें म्हणतील, हें असंभवनीय होय. साक्षात्काराशिवायहि त्यांनीं या मंत्राच्या उपदेशाची सर्वांना दीक्षा दिली असती, इतके ते प्रभावी होते. आपल्या आयुष्याचीं सतत ३६ वर्षें केवळ लोककल्याणार्थ अव्याहत परिश्रम घेऊन देशसंचार करून त्यांनीं जी धर्मजागृति केली ती आपणास महत्त्व प्राप्त व्हावें म्हणून खास नव्हे. हें त्या सुधारक म्हणवूं इच्छिणाऱ्यांनीं लक्षांत ठेवावें. हा वरील मंत्रच असा कांहीं अभूतपूर्व आहे कीं यांत आपल्या हिंदुधर्माचें सारभूत-तत्त्व गोवलेलें आहे. **श्रीपुरुषोत्तमजी** महाराजांची या मंत्रावर एक टीका हल्लीं उपलब्ध आहे. त्यांत त्यांनी असें दर्शविलें आहे कीं, 'हा मंत्र ज्याअर्थी प्रभुमुखारविंदांतून प्रगट झाला त्याअर्थी या मंत्राला आपोआपच वैदिकत्व प्राप्त होतें. तेव्हां हा गद्यमंत्र पूर्ण स्वतंत्र असून वैदिक आहे. कारण, वेदसुद्धां प्रभुमुखारविंदांतून प्रगट झाले आहेत.—

" **निश्वासभूता मे विष्णोर्वेदा जाताः** " [ मुक्तिको. १।९ ]

प्रभु म्हणतात—" सर्व चराचर जगत् व्यापून राहिलेले जें माझें विष्णुरूप त्याच्या निःश्वासापासून शाखोपशाखांसह सर्व वेदांचा प्रादुर्भाव झाला आहे."

" **अस्य महतो भूतस्य निश्श्वसितमेतद्यदृग्वेदो....**

**अस्यैवैतानि निःश्वसितानि** " [ बृ. उ. २।४।१० ]

" महतो भूतस्य–ज्याहून कोणीहि मोठा नाहीं म्हणजे अज अनादि अशा परमेश्वराच्या श्वासोच्छ्वासापासून ऋग्वेद, यजुर्वेद,

सामवेद, अथर्ववेद, उपवेद, उपनिषद् वगैरे सर्व कांही प्रकट झाले आहे."

आत्मनिवेदनाची ही सर्वमान्य उदात्त कल्पना आमच्या हिंदूच्याच काय परंतु प्रत्येक धर्मांतून प्रतीत होते. परमेश्वरचरणीं तन–मन–धनानें लागण्याची कल्पना इस्लामधर्मांत सुद्धा आहे. कार्लाइलनें इस्लामचा आत्मसमर्पण हाच अर्थ केला आहे. 'Islam means in its way denial of self, annihilation of self" [Hero and Hero Worship. P. 61].

आत्मसमर्पणाचें हे उदात्त तत्त्व इतर धर्मसंस्थापकानीं व आचार्यांनी निवेदन केले खरे; पण ते आचरणात आणण्याचा मान श्रीवल्लभाचार्यांनी मिळविला हे त्यांत विशेष आहे.

( ११ ) **विधिसंस्कारः–**

ब्रह्म व जीव हे ज्ञेय व ज्ञाता याचे स्वरूप समजावे–याचे अन्योन्य संबंध समजावे, यासाठीच 'शुद्धाद्वैत तत्त्वज्ञान' **श्रीवल्लभाचार्यांनी** प्रतिपादन केले. ब्रह्मातून व्युच्चरण पावलेला जीव पण ब्रह्मरूप आहे. हा संबंध समजला म्हणजेच जीवाची ऐहिक आसक्ति नष्ट होऊन त्याला प्रभुप्रपत्ति होते. तो "**समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं गुरुम्**–शिष्य हातात समिधा घेऊन श्रोत्रिय अशा ब्रह्मनिष्ठ गुरूजवळ जातो." गुरु त्याचे अहंकार व ममत्व या दोषाचे आविष्करण करून त्यांचा त्याग करण्यास अगोदर सांगतात व नतर वरील मंत्राप्रमाणे त्याला उपदेश करितात. ज्या दिवशी उपदेश करावयाचा असतो, त्या दिवशीं शिष्य स्नान करून शुचिर्भूत झालेला असतो. त्याचे मन प्रभूच्या पवित्र नामस्मरणात गढून गेलेले असतें व असा तो आकृष्ट झाला म्हणजे त्याला गुरु नवविधा भक्तींची माहिती देतात. उपदेश करावयाच्या दिवशी त्यानें उपवास करावयाचा असतो. जेव्हां प्रभूच्या वियोगाचे त्याला भान होईल तेव्हां गुरु त्याला वरील मंत्र सांगून

असा उपदेश करितात कीं, "अखिल-ब्रह्मांडनायक जो श्रीहरि त्याला तू या लोकांतील तुझ्या सर्व प्रिय वस्तु,देह, प्राण, इंद्रिय, अंतःकरण त्यांच्या वृत्ति, पुत्र, आप्त, धन व आत्मा यासमवेत सर्वस्व अर्पण कर." असे जो सेवक वरील मंत्रविधीप्रमाणें समर्पण करितो त्यालाच 'आत्म-समर्पण' किंवा 'आत्मनिवेदन' म्हणतात, व त्याच्या कृपेनें जो पुढें ब्रह्माशीं अंशांशीरूप अखंड संबंध जोडला जातो, त्यालाच ब्रह्मसंबंध म्हणतात.

## ( १२ ) ब्रह्मसंबंध म्हणजे काय ?—

'ब्रह्मसंबंध' यात दोन शब्द आहेत. एक ब्रह्म व दुसरा संबंध. ब्रह्माशीं जो संबंध, तो ब्रह्मसंबंध. पण 'ब्रह्म' म्हणजे काय हें अगोदर जाणल्याशिवाय ब्रह्मसंबंधाचा अर्थ बरोबर लागणार नाही. म्हणून 'ब्रह्म' कोणाला म्हणतात, हें अगोदर पाहूं:—

"केनोपनिषदांत मन, प्राण, वाणी, डोळे, कान यांना आपापली कामें करण्याची प्रेरणा किंवा शक्ति कोणापासून मिळते असा प्रथम प्रश्न विचारून त्याला असें उत्तर दिले आहे की, या मनाचें मन, प्राणाचाहि प्राण असा जो परमात्मा आहे त्याच्यामुळें हीं इंद्रियें आपआपलीं कामें करूं शकतात. त्या परमात्म्याला जे जाणतात ते "**प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति**" [ केनो. १ । २ ] मृत्यूनंतर अमर होतात. तो परमात्मा वाणीचा विषय होऊं शकत नाहीं; परंतु त्या परमात्म्यामुळें वाणीला बोलण्याचें सामर्थ्य आलें आहे. अशा रीतीचें जें परब्रह्म आहे, "**तदेव ब्रह्म त्वं विद्धि** [ केनो. १ । ५ ] तें तूं जाण." तें ब्रह्म भिन्नत्वानें जाणतां येत नसल्यामुळें जो त्याला "मीं जाणलें असें म्हणतो त्याला तें समजलेलें नसतें.

**यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः ।**

**अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम्"** [केनो. २।३]
असे ते ब्रह्म आहे. हे परब्रह्म सर्वत्र भरले आहे असे जे जाणतील
"**भूतेषु भूतेषु विचित्य धीराः प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति ॥**"
[केनो. २–५.] ते मृत्यूनंतर अमर होतील. असा या उपनिषदाचा उपदेश व आश्वासन आहे." (म. मां. इ. पृ. ४३)

छांदोग्योपनिषदांत (३।१४।१) "**सर्वं खल्विदं ब्रह्म**– असा सिद्धांत केला आहे व सृष्ट्युत्पत्तीच्या पूर्वी एकमेव अद्वितीय असें सत् ब्रह्मच होते."

तैत्तिरीय उपनिषदांत [२ । १] "**सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म**" असे आत्म्याचे स्वरूप सांगून त्यापासून सृष्ट्युत्पत्ति कोणत्या क्रमानें झाली त्याचे वर्णन केलें आहे. त्यावरून सृष्टीच्या उत्पत्तिविषयी प्राचीन लोकाच्या कल्पना कळून येतात....' **अद्रेश्यं** (अदृश्य), **अग्राह्यं**' (मुं१-१-६) "**न चक्षुषा गृह्यते नाऽपि वाचा** (मुं. ३-१-८) ब्रह्म हें अदृश्य व अग्राह्य असून मनाचा किंवा वाणीचा विषय होण्यासारखे नाही," ज्याच्यापर्यंत वाणीचा पल्लाच पोंचत नाही म्हणजे ब्रह्मांचें वाणीनें वर्णन करितां येणें शक्य नाही व मनानें ध्यानहि करितां येणार नाही––

**यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह ।**

**आनन्दं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कदाचन ।** (तै. उ. २।४,९)

असे या मंत्रांत सांगून ब्रह्मानंद ज्याला मिळाला त्याची भीति नाहशीं होते असा अनुभव वर्णिला आहे.

भृगुवल्लीत [३।१] "**यतो वा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवन्ति । यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति । तद्विजिज्ञासस्व । तद्ब्रह्मेति ॥**–ज्यापासून ही सर्व भूतें निर्माण होतात, ज्याच्यामुळें

जगतात आणि शेवटीं ज्याच्यांत प्रवेश करितात, तें ब्रह्म आहे. तें जाणण्याची इच्छा कर." असें वरुणानें आपला मुलगा जो भृगु त्याला उपदेश केला आहे. (म. सां. इ. पृ. ५०) गीतेंतहि "**निर्दोषं हि समं ब्रह्म**" [५।१९] असें म्हटलें आहे.

अशा ब्रह्माशीं अर्थात् निर्दोष व पूर्णगुण ब्रह्माशीं 'संबंध' म्हणजे सम्यक्–कदापि शिथिल न पडणारा अखंड असा जो बंध किंवा ग्रंथि तो ब्रह्मसंबंध. अशा ब्रह्माशीं जीवाचा अखंड संबंध जोडणें याला ब्रह्मसंबंध म्हणतात. याठिकाणीं ' ब्रह्म ' शब्दाचा कां निर्देश केला ? 'भगवान्' किंवा ' परमात्मा ' हे शब्द कां वापरले नाहींत ? संबंध किंवा ओळख ब्रह्माशींच कां ? असा साहजिकच प्रश्न उद्भवतो. याला कारण ब्रह्म हा एक महान् व्यापक प्रभु. उपनिषदांत भगवंताला ' ब्रह्म ' स्मृतींत ' परमात्मा ' व भागवतांत ' भगवान् ' म्हणतात, येथें ईश्वर, भगवान्, परमात्मा या शब्दांचा प्रयोग न करतां ब्रह्माचाच प्रयोग केला आहे; कारण तो सर्वस्वरूपी ओतप्रोत सर्वत्र भरलेला आहे. ब्रह्मशब्दानें प्रभूचें सर्वव्यापि स्वरूप दर्शविलें जातें; म्हणून ब्रह्मशब्दाचीच येथें योजना केलेली आहे. ब्रह्म सर्वत्र विद्यमान आहे. सर्वतुल्य आहे. तसेंच ब्रह्मरूप हें जगत् आहे. ब्रह्म हें पूर्ण पुरुषोत्तमाचें स्थान आहे. सर्व पदार्थ ब्रह्मरूप असूनहि त्यांत ब्रह्माचें प्रकट रूप दृग्गोचर होत नाहीं, म्हणून तें रूप प्रकट करून घेण्यासाठीं ब्रह्माचा संबंध करावयास हवा.

वस्तुतः ब्रह्मसंबंधानें परात्पर श्रीकृष्णाचाच संबंध होतो. या संप्रदायांत भगवान् पूर्ण पुरुषोत्तम श्रीकृष्णालाच ' ब्रह्म ' म्हणतात. ' **कृष्णो वै परमं दैवतम्** ' ' श्रीकृष्णापेक्षां श्रेष्ठ दैवत नाहीं ' असें त्यांचें म्हणणें आहे. तेव्हां ब्रह्मसंबंध म्हणजे जीव व भगवान् यांचें परस्पर सख्य किंवा अंगीकार होय. जीव भगवंताचा अगर ब्रह्माचा अंश आहे, तो त्यापासून उत्पन्न झाला; परंतु अविद्येनें

अज्ञानानें--सांसारिक मायेंत तो गुरफटला गेला म्हणून त्यांत त्याची आसक्ति झाली. त्यामुळें त्यांतील आनंदांश तिरोधान पावला. ब्रह्माचे सत्, चित् व आनंद हे तीन धर्म होत. या तीन धर्मांपैकीं जीवाच्या आनंदाचा लोप झाल्यामुळें तो अशुद्ध बनला. त्याला शुद्ध करण्यासाठीं प्रथमपासून 'भगवंताशीं आपला संबंध आहे' याची जाणीव किंवा ओळख त्याला करण्यांत येते व अंशी भगवंताशीं त्या अंश जीवाचा संबंध करण्यांत येतो व म्हणून " **यो यदंशः स तं भजेत्**–जो ज्याचा अंश त्यानें त्याला भजावें " तेव्हां जीव हा भगवंताचा अंश असल्यानें त्यानें त्याचें म्हणजे अंशी भगवंताचें स्मरण-भजन करावयाचें असतें म्हणून हा ब्रह्मसंबंध होय.

## (१३) ब्रह्मसंबंधाचें स्वरूपः—

ब्रह्मसंबंधाचा सरळ अर्थ म्हणजे जीव व परमात्मा यांचा परस्पर अंगीकार किंवा स्वीकार. वस्तुतः ब्रह्मसंबंध सर्व विद्येचें सार आहे; तत्त्व आहे. वेदमूल गायत्रींत 'वरेण्य' शब्द येतो. त्याचा अर्थ वरण्यास योग्य-अंगीकारास योग्य असा होतो. या शब्दाचें व्याख्यान करितांना भगवान् भाष्यकार श्रीमद्वल्लभाचार्य आज्ञा करितात--

**" वरेण्यमिति भक्तिबीजं, 'यमेवैष वृणुते तेन लभ्यः' इति श्रुतेः। एतेन परस्परं--वरणमुक्तं; वरणीयत्वोक्त्या यथा कन्या स्वाभिमतमेव वरं स्वपतित्वेन वृणुते वरो वा तादृशीमेव कन्यां स्वस्त्रीत्वेन; तथा भगवान् स्वदासत्वेनात्मीयत्वेनाङ्गीकरोतीत्युच्यते। "**

" ' वरेण्य' हें भक्तिबीज होय; कारण कीं 'यमैवेषः' या श्रुतींत वरणें अथवा अंगीकार करणें हें भक्तीचें बीज आहे, असा स्पष्ट उपदेश केला आहे. जसें वर वधूला वरतो अगर वधू वराला वरते

अर्थात् वधूवर परस्पर स्वाभिमत म्हणजे एकमेकास पसंत असेल तरच वरतात तसेंच भगवान् व भक्त सेव्यसेवकभावाने परस्पर वरतात. "वरणें अंगीकार करणें, निवेदन किंवा ब्रह्मसंबंध करणे हे शब्द काहीं श्रीवल्लभाचार्यांच्या कल्पनेंतन उत्पन्न झालेले नाहीत. परंतु गायत्री मंत्राचा परम निगूढ आशय आहे. परम रहस्य आहे. तेव्हां ब्रह्म-संबंध ग्रहण करून प्रभूला सर्वस्व अर्पण करणे हा मानव जातीचा परम धर्म आहे. 'ब्रह्मसंबंध' हा गायत्री मंत्राचेच मर्म आहे, एवढेच नव्हे; तर सर्व विद्येचे परम आधिदैविक रहस्य आहे.

तसेच ब्रह्मसूत्रांत आनंदमयाधिकरणांत व लिंगभूयस्त्वाधिकर-णांत सूत्रकारांनी ब्रह्मसंबंधाचें सूचन केले आहे व श्रीमद्भाष्यकार श्रीवल्लभाचार्यांनी त्याचे विवेचन करून ब्रह्मसंबंधाचें समर्थन केलें आहे. वस्तुतः सूत्राचा साधनाध्याय व फलाध्याय यात अनेक दृष्टिबिंदूंनी याच रमणीय व कमनीय ब्रह्मसंबंधरूप सर्वात्मभावाचें प्रतिपादन केले आहे. जसें बृहदारण्यकात 'समर्पिताः' शब्दानें समर्पणाचे स्पष्ट कथन केले आहे. तसेंच ब्रह्मसूत्राच्या साधनाध्या-याच्या तृतीय चरणांत '**प्रदानवदेव तदुक्तं**' [ ३ । ३ । ४३ ] सूत्रांत सूत्रकारांनी आपला पारिभाषिक 'प्रदान' शब्द स्पष्ट वापरला आहे. ब्रह्मसंबंध, भगवद्वरण, भगवदंगीकार जीवकृत साधनसाध्य नाहीं पण प्रभुदत्त आहे. ज्या वस्तूचें आपणास ज्ञान आहे, ती वस्तु जर देण्यांत आली तर तिला 'दान' म्हणतात. परंतु ज्या वस्तूबद्दल आपणास कांहीच माहित नाही. अशी वस्तु जर अत्यंत प्रमेयबलानें देण्यांत आली तर तिला 'प्रदान' म्हणतात. तेव्हां या ब्रह्मसंबंधांतील सर्वात्मभावाचें अज्ञान भक्ताला असूनसुद्धां प्रभु जें या ब्रह्मसंबंधाचें-सर्वात्मभावाचे दान करतात तो ब्रह्मसंबंध केवळ 'दान' नसून 'प्रदान'' आहे. महादान आहे.

श्रीवल्लभाचार्य म्हणतातः--"**भगवत्सम्बन्धो हि कोटिकल्प-वृक्षादप्यधिकः** ॥--( तृ. स्कं. सु. पृ. २७ पं. २५-२६ ). भगवंताचा संबंध खरोखर कोटिकल्पवृक्षापेक्षांहि अधिक आहे."

**(१४) अर्पणाचें तत्त्वः—**

या ब्रह्मसंबंधांत प्रभूला आपलें सर्वस्व समर्पण करावयाचे असतें. 'आपल्याजवळ जें कांहीं आहे तें सर्व प्रभूचें आहे.' अशी भावना झाली पाहिजे. "ईश्वर आणि मनुष्य, परमात्मा आणि आत्मा यांमध्यें राजा आणि प्रजा यांच्यासारखा मूळसंबंध आहे. या संबंधा-मुळे जें जें आपणास प्राप्त होतें त्याचा अंश मात्र तरी ईश्वरप्रीत्यर्थ आपण अर्पण केला पाहिजे. ईश्वरापुढें आपणास नम्र करून घेण्याची व त्याचे उपकार प्रत्यक्षपणें मानण्याची ही योजना आहे. ईश्वरास कोणतीहि गोष्ट कमी आहे ती पुरवण्याचा यांत अंश नाहीं. परंतु या योजनेचा भक्ति, त्याग व परोपकार यांशी पुढे संबंध जडतो व त्यापासून अनेक उत्कृष्ट धार्मिक रूढी उत्पन्न होतात." ( गोळेकृत हिंदुधर्म व सुधारणा पा. ७०. ) समर्पण करण्यांत आपण प्रभूवर कांहीं उपकार करीत नाहीं; परंतु "**त्वदीयमेव तुभ्यं समर्पितम्**—या वचनाप्रमाणें प्रभूचीच वस्तु प्रभूला अर्पण करीत असतों."

वेद उच्च स्वरानें जीवाला उपदेश करितात—हे जीवा ! प्रभूवि-षयीं तुझ्या कर्तव्याचा तूं विचार कर. तुझें कर्तव्य प्रभूला आपलें सर्वस्व अर्पण करण्याचें आहे [ऋ. २-१०]

"**आयुर्यज्ञेन कल्पताम्**—आयुष्य प्रभूला अर्पण कर."

"**प्राणो यज्ञेन कल्पताम्**—प्राण प्रभूला अर्पण कर."

"**चक्षुर्यज्ञेन कल्पताम् श्रोत्रं यज्ञेन कल्पताम् । मनो यज्ञेन कल्पताम्**—नेत्र कान मन वगैरे प्रभूलाच अर्पण कर."

शांडिल्यसूत्रांत "**तदर्थ प्राणस्थानं तदीयता**—प्रभुअर्थीं प्राण धारण करावे म्हणजे प्राणसुद्धां प्रभूला अर्पण करावे. प्रत्येकें

श्वासाबरोबर प्रभूचें स्मरण करणें याला ‘तदीयता’ म्हणतात.” भागवतांत सुद्धां प्रभूला सर्वस्व अर्पण करण्याचाच उपदेश केला आहे.

**“मय्यावेश्य मनस्तात कुरु कर्माणि मत्परः ।”** (भा.७-१०-२३)

नृसिंहरूप भगवंतांनीं प्रल्हादास ‘माझ्या ठिकाणीं चित्त ठेवून सर्व कर्मे कर ’ असा उपदेश केला असून पुढें ‘ भगवद्भक्तानें सर्व कर्मे नारायणार्पण करावीं ’ असें एकादश स्कंधांत भक्तियोगाचें तत्त्व सांगितलें आहे. तसेंच—

**तपस्विनो दानपरा यशस्विनो मनस्विनो मन्त्रविदः सुमङ्गलाः ।**
**क्षेमं न विन्दन्ति विना यदर्पणं तस्मै सुभद्रश्रवसे नमो नमः ॥**
( २-४-१७ ).

“ तप करा, दान करा अगर वेदविहित अन्य कर्म करा; पण इतकें ध्यानांत ठेवा की, प्रभूला अर्पण केल्याशिवाय क्षेम प्राप्त होत नाहीं. याचप्रमाणें भागवताच्या एकादश स्कंधांत—

**यद्यदिष्टतमं लोकेयच्चातिप्रियमात्मनः ॥**
**तत्तन्निवेदयेन्मह्यं तदानन्त्याय कल्पते ॥**

“ जगांत जें जें कांहीं उत्तम व आपल्याला अति प्रिय असेल तें तें सर्व मला अर्पण कर म्हणजे तें अर्पण अपरिमित फल देणारें होईल. असें भगवान् श्रीकृष्ण म्हणतात. म्हणून

**कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वाऽनुसृतस्वभावात् ।**
**करोति यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत् ॥**
( भा. ११-२-३६ )

“ काया, वाचा, मन, इंद्रियें, बुद्धि अगर आत्मा यांच्या प्रवृत्तीनें किंवा स्वभावानुसार जें कांहीं आपण करितों. तें सर्व परात्पर नारायणाला समर्पण करावें ” असा प्रभूचे अंशावतार श्रीऋषभदेवाचे पुत्र नव योगेश्वर निमि राजाला उपदेश करितात. तसेंच

अंबरीष राजाच्या चरित्रांत सांगितलें आहे कीं अंबरिष चक्रवर्ती असून सुद्धां तो आपले सर्व व्यवहार, इंद्रिय, प्राण, मन द्रव्यादिक सर्व प्रभूलाच अर्पण करून तदर्थच कर्म करीत असे. अशा त्या राजाचा द्रोह करणाऱ्या दुर्वासाचें रक्षण ब्रह्मादिक देवसुद्धां करूं शकले नाहींत; दुर्वासमुनि रक्षणाकरितां भगवंताजवळ गेले असतां भगवान् म्हणाले:—

**ये दारागारपुत्राप्तान्प्राणान्वित्तमिमं परम् ।**
**हित्वा मां शरणं याताः कथं तांस्त्यक्तुमुत्सहे ॥** (भाग.९-४-६५)

" जे भक्त स्त्री, घर, पुत्र, स्नेहीवर्ग, प्राण, द्रव्य इहलोक व परलोक यांचा त्याग करून मला शरण येतात, त्यांचा त्याग करण्यास हे दुर्वासमुने ! मी कसा उत्सुक होईन ? " इत्यादि श्लोकांतून प्रपत्तिपूर्वक समर्पणाचें तत्त्व स्पष्ट निवेदन केलें आहे.

या आत्मनिवेदनावर पांच टीका आहेत. यात जें समर्पण करण्यांत येते त्याची योग्यता गायत्रीमंत्राइतकीच श्रेष्ठ आहे. समर्पण हें भक्तिमार्गीय आहे. भगवंतांना ज्या ज्या वस्तु सप्रेम अर्पण करण्यांत येतात त्या त्या वस्तूंचा ते आदरानें स्वीकार करतात. कारणः—

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥** ( गी. ९-२६ )

" एखादें पान, फूल, फळ किंवा (यथाशक्ति) थोडें पाणीहि जो मला भक्तीनें अर्पण करितो, त्या प्रयतात्म म्हणजे नियतचित्त पुरुषाची ती भक्तीची भेट मी (आनंदानें) सेवन करितों " असेंच प्रीतिपूर्वक अर्पण केलेले सुदाम्याचे पोहे, विदुराची भाजी, शबरी भिल्लीणीचें बोर, विदुरपत्नी अनुमतीनें दिलेली केळ्याची साल, रुक्मिणीचें तुलसीपत्र, व द्रौपदीनें दिलेलें मेथीच्या भाजीचें एक पान हीं सर्व भक्तीनें अर्पण केली असल्यामुळें प्रभूनें आनंदानें चाखिली

आहेत. असें भावपूर्वक समर्पण करणें म्हणजेच **आत्मनिवेदन** होय. भक्तिमार्गाचा बोध करणारे सर्व आचार्य व भक्त प्रभुप्राप्तीच्या मार्गांत अर्पणाला सर्वोत्तम साधन समजतात. हें समर्पण पुष्टिमार्गीय प्रथमसंस्कारस्वरूप आहे. यानें अविद्येचा नाश होतो, सेवेला मनुष्य अधिकारी बनतो; व पुष्टिमार्गीय सिद्धांताप्रमाणें आपली जीवन नौका वल्हविण्यास तो लायक होतो. जनकराजानें स्वतःचे गुरु याज्ञवल्क्य यांना निवेदन केलें की, माझा देश, देह व आत्मा हें सर्व मी प्रभूला अर्पण केलें आहे व माझे व्यवहार परमेश्वरार्पणपूर्वक लोकोपयोगाकरिता निष्कामबुद्धीनें चालू आहेत. तेव्हां खरे भगवद्भक्त आपल्या खाण्यापिण्याचे व्यवहारहि कृष्णार्पण बुद्धीनेंच करीत असतात. हीच त्यांची आत्मनिवेदनांत उत्कट भावना असते.

### (१५) अर्पणांत उत्कट व आत्यंतिक भाव पाहिजेः—

**वाल्मीकिऋषींनीं** परमभक्तश्रेष्ठ नारदाला जेव्हां शरणप्रपन्न होऊन आत्मनिवेदन केलें, तेव्हांच त्यांना दिव्यज्ञान प्राप्त झालें व त्यांनीं रामायणासारखा अद्भुत ग्रंथ लिहून जगावर कायमचा उपकार करून ठेविला. म्हणून जे कोणी स्वतःचें कार्य आत्मनिवेदनपूर्वक करितात, त्या कार्याला श्रेष्ठत्व प्राप्त होते. शिवाजी महाराजांनी आपलें सर्व राज्य रामदासस्वामींना अर्पण केलें. स्वामींचा त्यांच्यावर अनुग्रह झाला तेव्हां ते म्हणाले—"शिवबा, हें राज्य तुला कृपाप्रसाद म्हणून परत देतों; परंतु 'हें राज्य प्रभूचें आहे' अशी भावना मनांत ठेव, व याचें स्मरण तुला सदोदित व्हावें म्हणून महाराष्ट्राचा झेंडा भगवा कर." या कृपाप्रसादानें शिवाजी राजे स्वराज्य स्थापन करण्यास समर्थ बनले. राज्य प्रभूचें आहे या भावनेनें महाराजांनीं भगवा झेंडा फडकाविला, हीच आत्मनिवेदनाची उच्च भावना होय!

राजा मयूरध्वजाची गोष्ट तर सर्वविश्रुतच आहे. भगवान् श्रीकृष्ण अर्जुनासहित राजा मयूरध्वजाकडे साधुवेषानें गेले असतां त्यांनीं राजाचें अर्धें शरीर आपल्या मुलाच्या जीवसंरक्षणार्थ वाघाला देण्यासाठीं मागितलें. राजानें त्या मागणीचा मोठ्या आनं-दानें स्वीकार केला. साक्षात् भगवान् आपल्या साधुवेषानें आले आहेत, हें त्यानें अंतर्ज्ञानानें तेव्हांच जाणलें. अशी सुवर्णसंधि पुन्हां कधीं मिळणार नाहीं, असें जाणून लगेच आपल्या पुत्राला व राणीला आपलें अर्धें शरीर कापण्यास आज्ञा केली. चिरतांना राजाच्या डाव्या नेत्रांत अश्रू आले. त्यानें तर आपली प्रियवस्तु भगवंताला अर्पण केलीच होती. मग हे डोळ्यांत अश्रू कां आले ? अश्रू आलेले पाहून साधुवेषधारी भगवान् म्हणाले—"तुला जें अर्पण करावयाचें तें तूं प्रसन्नचित्तानें अर्पण केलें पाहिजेस, पण ज्या अर्थी तुझ्या डाव्या डोळ्यांत अश्रू येत आहेत त्या अर्थी तुला कष्ट होत असले पाहिजेत. म्हणून मला हें असें दुःखी होऊन असंतोषानें दिलेलें नको." तेव्हां राजा मयूरध्वज म्हणाला—"भगवन्! माझें अर्धें शरीर तर प्रभुसेवे-करितां उपयो आलें; पण बाकीच्या अर्ध्या शरीरानें कोणतें पाप केलें कीं, तें प्रभुप्र र्थ उपयोगांत येऊं नये ? मी हें अर्पण दुःखित अंतःकरणानें रीत नसून श्रद्धायुक्त पूर्णभक्तिपूर्वकच करीत आहें; परंतु या माझ्या शरीराच्या डाव्या अंगाचा उपयोग प्रभूला होत नाहीं, म्हणून डाव्या नेत्रांतून पाणी येत आहे." अशी त्यांची उत्कट भावना पाहून प्रभूनें आपलें खरें रूप प्रकट केलें, व त्या राजाला दर्शन दिलें.

अर्पणांत असा उत्कट व आत्यंतिक भाव पाहिजे तेव्हांच प्रभु संतुष्ट होतात. असें अर्पण करणाऱ्या भक्ताला स्वतःच्या देहाला चिरण्याबद्दल सुद्धां आनंदच वाटतो. त्याच्या शरीराचें वाटेल तें करा, त्याला दुःख होत नाहीं. जर राजाला यत्किंचितहि दुःख झालें असतें

तर तें शरीर प्रभूनें स्वीकारलें नसतें. म्हणून हर्षभरानें समर्पण झाले पाहिजे. व अशा प्रेमानें समर्पण केलेल्या भक्तांचा प्रभु कधींहि त्याग करीत नाहीं. व असे महात्मे भक्त नित्य शांतिसुखाचा अनुभव घेत असतात.

## (१६) अहंकार व ममत्व यांचा त्यागः—

ब्रह्मसंबंधाची दीक्षा घेतांना सर्वस्व अर्पण करण्याचें महत्त्व आपण जाणलें; परंतु हे अर्पण, ज्या वस्तु प्रभूला अर्पण करावयाच्या त्यावरील आसक्ति सोडल्याशिवाय सम्यक् होणें शक्य नाहीं, व ती आसक्ति कशी नाहीशी केली पाहिजे या बाबतीत आपले धर्मग्रंथ व साप्रदायिक ग्रंथकार काय म्हणतात ते पाहूं:—

जगांतील यच्चयावत् वस्तु प्रभूच्या आहेत. जर आपण बारकाईनें पाहिलें तर आपला कोणत्याहि पदार्थावर हक्क नाहीं. पदार्थ मिळविण्याकरितां आपण किती खटपटी केल्या, उपाय योजिले तथापि कोणतीहि वस्तु प्रभुकृपा झाल्याशिवाय मिळत नाही. ज्याला हें समजलें त्याला दृष्टोत्पत्तीस येणारीं कितीहि सुखदु:खें येवोत तो आपल्या मार्गापासून च्युत होत नाही, त्याला कोणताहि विकार होत नाही. 'हें माझें, तें माझें,' या आसक्तबुद्धीनें त्यानें आपल्यावर नानातऱ्हेचीं दु:खें ओढवून घेतलीं आहेत. याचें कारण मनुष्याच्या अंगीं असलेला अहंकार व ममत्व हे दुर्गुण होत. या दुर्गुणांना फाटा दिल्याशिवाय प्रभूला आत्मनिवेदन करणेंच शक्य नाहीं. सांप्रदायिक ग्रंथांतून याच्या त्यागाविषयींच अगोदर सांगितलें आहे.

**श्रीवल्लभाचार्यां**चा या बाबतींत फारच सुंदर उपदेश आहे. ते म्हणतात "**प्राप्तं सेवेत निर्ममः**—आसक्तीचा त्याग करून जें कांहीं प्राप्त होईल तें तूं भोग. संसारांत अनासक्त राहून जर ईश्वरभक्ति

केलीस तरच भक्तीचें फळ तुला मिळेल.'' म्हणून ''**विमुक्तः सर्वलोकतः कृष्णमेव विचिंतयेत्**–सर्व लोकांपासून दूर राहून व ममत्वाचा त्याग करून श्रीकृष्णाचें चिंतन करावे. '' गृहादि कृत्यात ममत्वाचा त्याग करावा, 'हें अखिल विश्व प्रभूचें आहे.'अशी भावना ठेवावी.'**कृष्णार्थं तत्प्रयुंजीत**-प्रभुसेवेंतच त्याचा (गृहादिकांचा) विनियोग करावा. या प्रमाणे वागल्यास तुझें घर प्रभूचें निवासस्थान होईल. अशानें तुझें अंतःकरण शुद्ध राहून तूं पापकर्मांत प्रवृत्त होणार नाही.' कारण ''**कृष्णोऽनर्थस्य मोचकः**–कृष्ण हा अनार्थाचा नाश करणारा आहे.'' साम्प्रदायिक अन्य ग्रंथांतून असाच सुंदर व मार्मिक उपदेश केलेला आहे.

प्रभूपासून व्युच्चरण पावलेल्या जीवाला प्रभुसंबंध कसा होईल याचें उत्तर **श्रीहरिराय** देतात–'**संबधस्तु प्रपञ्चासक्तिनिवृत्या भवति**' प्रपंचांत म्हणजे संसारांत राहून देहकृत्यादिकांत आसक्तीचा त्याग करावा, हाच एक रामबाण उपाय आहे. संसारासक्ति दूर केल्याशिवाय प्रभूचा जीवाशीं संबध होणें कठीण आहे. तसेंच ते '**स्वमार्गीयशरणसमर्पण सेवादिनिरूपणम्**' या ग्रंथांत म्हणतात–

**कृष्णं सर्वात्मकं ज्ञात्वा दीनतां हृदि भावयेत् ।**
**अहं करोमीत्येतादृगहंकारं परित्येजत् ॥ ७५ ॥**

'' कृष्ण सर्वात्मक आहे असें जाणून हृदयांत दीनतेची भावना ठेवावी.' मी करितों' अशा अहंकाराचा सर्वथा त्याग करावा.'' तसेंच 'लघूत्तम जन्मवैफल्य' या ग्रंथांत ते म्हणतात कीं –अहंताममतात्मक संसाराला जो चिटकून राहातो व प्रभुसेवापरायण होत नाहीं त्याचा जन्म वृथा आहे.

अहंकार व ममत्व हें मुमुक्षूचे कट्टे वैरी होत. यांच्या त्यागाविषयीं हिंदुधर्मांतच केवळ आज्ञा आहे असें नाहीं; पण वेदाला प्रमाण

न मानणाऱ्या अनेक धर्मांतून सुद्धा हाच सिद्धांत प्रतिपादन केला आहे, प्रभूचें अस्तित्व मानणारा असा एकहि धर्म नाही कीं ज्यात संसारासक्ति दर्शविली आहे. व अनासक्तीचा उपदेश केलेला नाही. कोणत्याहि धर्माचा प्रमाणग्रंथ घेतला तरी त्यांत अगोदर अहंकार व ममत्व याच्या त्यागाविषयींच सांगितलेलें आढळून येतें. हा त्याग ब्रह्मसंबंधाची अर्थात् आत्मनिवेदनाची दीक्षा देतांना गुरु प्रथम करवून घेतात, व नंतरच 'प्रभूला आपलें सर्वस्व अर्पण कर' अशी आज्ञा करतात. ईशावास्योपनिषदांतले पहिलेच दोन मंत्र असे आहेत :—

**ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ।**
**तेन त्यक्तेन भुंजीथाः मा गृधः कस्यचिद्धनम् ॥ १- १ ॥**
**कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः ।**
**एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥ १-२ ॥**

"जगांतील प्रत्येक वस्तु परमेश्वरानें व्यापिली आहे. तेव्हा आसक्तीचा त्याग करून किंवा त्या वस्तू ईश्वराला अर्पण करून त्यांचा उपभोग घ्या. कोणाच्याहि धनाचा लोभ करूं नका. या जगांत कर्मे करीतच शंभर वर्षे जगण्याची इच्छा करावी. यापेक्षां तुला दुसरा मार्ग नाहीं; व या योगानें कर्माच्या ठिकाणीं मनुष्य लिप्त होत नाहीं." ईश्वरार्पणपूर्वक सर्व कर्मे करण्याचा भक्तिमार्गांत पुढें जो उपदेश झाला त्याचें येथें स्पष्ट बीज दिसत आहे." (म. सां.इ. पृ.४२) जगाचे व्यवहार व सुस्थिति कायम राहण्यास कर्म सर्वांनींच केलें पाहिजे; पण अज्ञानी लोक हें कर्म 'माझें,' म्हणून ज्याप्रमाणें करीत असतात तसें न करितां ज्ञानी पुरुषानें ब्रह्मार्पण-बुद्धीनें आमरण सर्व कर्मे करावी. कारण—

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यासि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम्** ( गी. ९–२७ )

" ज ज करशील, खाशील, हवन करशील, देशील किंवा तप करशील तें तें सर्व मला अर्पण कर—म्हणजे तुला कर्माचें बंधन लागणार नाहीं." असें या श्लोकांत उपदेशिलें आहे. भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला ज्ञान देतांना म्हणतात—

**निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ।** ( गी. २-७१ )

तुला जर शांति मिळवायची असेल तर अहंकार व ममत्व यांचा त्याग कर. तसेंच—

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।**
**विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥** (गी.१८-५३)

"अहंकार, बल, गर्व, काम, क्रोध व परिग्रह म्हणजे स्त्री पुत्रादिकांचा पाश हें सर्व सोडून शान्त व ममत्वरहित झालेला पुरुष ब्रह्मभूत होण्यास समर्थ होतो." 'मी' ही अहंकारबुद्धि सुटली ह्मणजे अचेतन इंद्रियें आपण होऊन कांहीं वाईट काम करूं शकत नाहींत, व तीं स्वतःच्या ताब्यांत राहतात; अहंकारयुक्त आसक्ति सुटली म्हणजे तीं कर्में बंधक होत नसल्यामुळें आसक्ति सोडणें हेंच काय तें तत्त्व मुख्य बाकी रहातें. हे जें अनासक्तीचें तत्त्व त्याच तत्त्वाची या ब्रह्मसंबंधाची दीक्षा देतांना शिकवण दिली जाते. संसारावरील आसक्ति सोडणें हें दुर्घट काम खरें; परंतु याला **श्रीवल्लभाचार्यांनीं** युक्ति शोधून काढली आहे. शोधून काढली म्हणण्यापेक्षां शास्त्रांतच गुप्त असलेली युक्ति प्रकाशांत आणली आहे; कारण संसार सोडला म्हटल्यानें तो सुटत नाहीं. तेव्हां संसार करा, पण त्यावर आसक्ति न ठेवतां तो ईश्वरार्पणबुद्धीनें करून आसक्ति ईश्वरावर ठेवा. म्हणजे, त्या आसक्तीचें स्थान मात्र बदललें. त्या आसक्तीचें प्रमाण कायमच राहून ती वाढविण्याचा प्रयत्न केल्यास ती श्रेयस्कर व कल्याणप्रद अशी मोक्षप्राप्तीस कारण होईल; अशी

आत्मसमर्पणाची संवय प्रत्येक कार्यांत झाल्यावर त्याची पूर्ण निष्काम-वृत्ति कायम होऊन तो संसारासक्त होत नाहीं. आत्मसमर्पणाची ही संवय किंवा नेहमीं आठवण ठेवण्यास **श्रीवल्लभाचार्यां**ची आज्ञा आहे. **"निवेदनं तु स्मर्तव्यं सर्वथा तादृशैर्जनैः ॥ २ ॥"** ( नवरत्न ) निवेदन मंत्रानंतर वैष्णवानें सत्समागमात राहून निरंतर त्याचें स्मरण करावें; कारण त्यायोगें आपल्या मनातील अहंकार व स्वार्थ नाहीसा होतो व ' मी प्रभूचा आहें. प्रभूच माझें सर्वस्व आहे.' अशी भावना आपल्या मनांत जागृत होते. जोपावेतों संसारावरील आसक्तीचा नायनाट होत नाहीं, अहंकार व ममत्व याचा त्याग केला जात नाहीं, तोपावेतों प्रभुप्राप्ति होणे शक्य नाहीं. तसेंच जोंपर्यंत त्यागबुद्धि हृदयात उद्भवत नाहीं, तोपर्यंत संन्यास घेऊन ज्ञानकर्म-द्वारा रानावनात भटकणें निरर्थक आहे. अशा रीतीचा संन्यास आत्म्याला क्लेशदायक आहे. जीवाची ही अर्धदग्ध अवस्था होय. अशा संसारासक्त हृदयांत प्रभु कधीहि वास करीत नाहीं. अहंकार व ममत्व या दोघांचा त्याग केल्याशिवाय मोक्ष मार्गावर पाऊल ठेवणें अशक्य आहे. ही जी त्यागबुद्धि ती फक्त आत्मनिवेदन किंवा आत्मसमर्पणानेंच सिद्ध होते. ही त्यागबुद्धि अर्थात् " वासना शून्य करण्याचें कर्म अत्यंत दुर्घट असून तें विशेष ईश्वरी अनुग्रहाखेरीज एकाएकी कोणा-सहि साध्य होणें केवळ दुर्घट नव्हे तर अशक्य आहे. " ( गी. र. ६४१ ) यासाठीच विशेष ईश्वरी अनुग्रह संपादन कर-ण्यास ब्रह्मसंबंधाची आवश्यकता आहे; कारण, अहंकार व ममत्व दोन अडचणी प्रभुप्राप्तीत येत असतात. त्यांचाच अगोदर उच्छेद केला पाहिजे. **वेणुनाद** वर्ष २ पृष्ठ ५ मध्यें संस्कृतभाषेंत गद्यटीकेचा थोडा भाग आलेला आहे. त्यांत अविद्येनें जीवाला अहंताममतात्मक संसाराचा संबंध होतो. त्यांत तो लपेटतो. त्यामुळें

देहादिकांत देहासंबंधीं अध्यास उत्पन्न होतो. देह हा प्राकृत असल्यामुळें तो दोषार्ह आहे. त्यामुळें त्याचा विलय भगवंतांत लागलीच होत नाहीं. म्हणून भगवत्संबंधीं समर्पणसंस्कारानें त्याला निर्दोष केलें पाहिजे. देहादिसमर्पणांत ममतेचे विषयरूप जे दार, घर, पुत्र, आप्त, द्रव्य वगैरे त्याचेंसुद्धां समर्पण झालें पाहिजे. अन्यथा त्यांत ममत्व राहातें. त्यांनासुद्धां या समर्पण संस्काराची जरूर आहे. व हें समर्पण गुरुद्वारा झालें पाहिजे. अशी सांप्रदायिक आज्ञा आहे.

( १७ ) गुरुमहिमाः—

स्वामि विवेकानंद आपल्या एका व्याख्यानात गुरुविषयीं किती उच्च आदर दर्शवितात ते पहाः—

"The vibration of light is every where, omnipresent; but we have to strike the light of the lamp before we can see the light. The omnipresnt God of the Universe cannot be seen until He is reflected by these giant lamps of the earth,— the prophets, the man-God, the incarnations, the embodiment of God."

[ प्रकाशाचे तरंग सर्वत्र सारखे भरून राहिले आहेत हेहि खरें; तथापि तो प्रकाश आपल्या दृष्टिपंथांत येण्यास आपणांस काडी ओढून दिवा लावावा लागतो. अत्यंत गाढ अशा अंधकारांतहि प्रकाश किरण नाहींत असें नाहीं; पण त्या प्रकाशाचा आपणांस अनुभव होण्यास दिवा लावावा लागतो. त्याचप्रमाणें सर्वत्र भरून उरलेल्या परमेश्वराचें व्यक्तरूप आपणांस पाहावयाचें असेल तर तें या अत्यंत उज्ज्वल दीपांच्या ठिकाणींच आपणांस दृग्गोचर होईल. हे पुरुष परमेश्वराचे अवतार होत. परमेश्वर यांच्या रूपानें जणूं काय प्रत्यक्षच अवतरला आहे.]

पुष्टिमार्गीय वैष्णव होण्यास ब्रह्मसंबंधाची दीक्षा गुरु देत असतात. गुरु हे मार्गदर्शक होत. भगवत्प्राप्तीचा मार्ग ते दर्शवितात. व ब्रह्माचें ज्ञान करून देतात. गुरु ईश्वररूप आहे. वाल्मीकि ऋषि पूर्व आयुष्यांत ब्राह्मणच असून दुराचारानें वाल्याकोळी झाले होते. त्यांचें पूर्व आयुष्य चोरी व लुटारूपणा यांत गेलें असें पुराणांतरीं आहे. परंतु देवर्षि भक्तश्रेष्ठ नारदासारखे गुरु मिळाल्यानंतर त्यांच्या उपदेशानें प्रभूचा त्यावर अनुग्रह झाला. केवढा हा गुरुप्रसाद !

गुरु हा अनेक जन्मापासून प्रभूचें विस्मरण पडलेल्या जीवाला प्रभूजवळ नेऊन त्याचा संबंध जोडतो. म्हणून शास्त्रांत गुरूला प्रथम वंदन आहे. वैष्णवानें गुरु अवश्य केला पाहिजे. सर्व सामर्थ्यवान् दत्तात्रेयानीं चोवीस गुरु केल्याचे भागवतादि पुराणांत [भाग १०] लिहिलें आहे. प्रभु श्रीकृष्णांनींसुद्धां मनुष्यवताराचें नाट्य नटविण्याकरितां सांदीपनी गुरु केले होते. गुरु हे परमार्थाचा मार्ग दर्शविणारे आहेत. म्हणून आत्मनिवेदन करतांना भक्तिमार्गीय गुरूंचा उपदेश घेऊन तदनुसार आत्मसमर्पण केलें पाहिजे.

### ( १८ ) उत्तम गुरूचें लक्षणः—

भक्तिमार्गीय गुरू कसे असावेत यासंबंधीं **श्रीवल्लभाचार्यांचें** वचन येथें उद्धृत करणें अवश्य आहे. ते असें:—

**कृष्णसेवापरं वीक्ष्यं दंभादिरहितं नरम् ।**
**श्रीभागवततत्वज्ञं भजेज्जिज्ञासुरादरात् ।।**

( त. दी. नि. स. प्र. श्लोक २२५–२२६. )

**तद्भावे स्वयंवापि मूर्तिं कृत्वा हरेःक्वचित् ।**
**परिचर्यां सदा कुर्यात् तद्रूपं तत्र च स्थितम् ।।**

जो नर श्रीकृष्णाच्या सेवेंत नित्य तत्पर असतो, जो दंभ, दर्प, अभिमान, काम, क्रोध, कठोरता व अज्ञान इत्यादि दुर्गुणांनीं रहित

असतो, जो भागवतधर्माच्या तत्त्वज्ञानाचा ज्ञाता आहे, अशा गुरूला जिज्ञासु वैष्णवाने आदरपूर्वक भजावें. कदाचित् उक्त लक्षणांचा गुरु न मिळाला तर स्वतःच यथाशक्ति सुवर्णादि धातूंची किंबहुना मृत्तिकेचीसुद्धां श्रीकृष्णाची मूर्ति करून तिची उपासना करावी व तीच आपला गुरु आहे अशी भावना ठेवावी. श्रीवल्लभाचार्यांचें हें वचन किती निस्वार्थी व निःपक्षपाती आहे हें त्यांच्या वरील वचनावरून दिसून येते. गुरुभक्तीविषयीं वेद म्हणतात—

**यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।**
**तस्यै ते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः॥**(श्वेताश्व६-२३)

"ज्याची जशी देवावर परा भक्ति असेल तशीच जर गुरूचेंहि ठिकाणी असेल तर गुरुकृपेनें वेदांतून कथन केलेल्या गुह्य अर्थांचा त्यावर प्रकाश पडतो व नंतर त्याला ब्रह्मज्ञान प्राप्त होतें. तात्पर्य—प्रभूशी तुझा संबंध कोणत्या तऱ्हेचा आहे हें गुरु नीट विशद करून सांगतो व ब्रह्मज्ञानास शिष्याला अधिकारी करतो. श्रीशंकराचार्यांनीं गुरूला स्पर्शकांतमण्यापेक्षांहि अधिक महत्व दिलें आहे. कारण शिष्याला ब्रह्मसाक्षात्कार होऊं शकेल असें उपरिनिर्दिष्ट गुरूंत सामर्थ्य असतें. व अशा योग्य गुरूच्या अभावीं भगवंताची एक मूर्ति घेऊन त्यांत भगवंताची पुरुषोत्तम प्रतिष्ठा करावी, व सदोदित त्याची सेवा करावी. असा नरहरि यतीला श्रीवल्लभाचार्यांनीं उपदेश केला आहे. ज्या गुरुजवळून ब्रह्मसंबंधाची दीक्षा घ्यावयाची तो गुरु दीक्षा देण्यास लायक आहे किंवा नाहीं हें अगोदर पाहिलें पाहिजे. व विष्णुपराङ्मुख गुरु असेल तर त्याचा जरूर त्याग करावा. कारण तो गुरुपदाला योग्य नसतो असें शास्त्रांत म्हटले आहे.

**" गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ।**
**उत्पथप्रतिपन्नस्य न्याय्यं भवति शासनम् ॥**

" गुरु जर योग्य मार्गानें वागत नसेल किंवा त्याच्या वर्तनांत पाखंडत्व दिसून येत असेल तर शिष्यानें बेधडक गुरूला योग्य तें वळण लावावें" व तसें सांगण्याचा त्यास अधिकार आहे. स्वधर्म संरक्षणार्थ सांगण्याचा हा हक्क आजचा नसून परंपरा प्राप्त आहे.

## ( १९ ) गुरु कोण ?

'या संप्रदायांत गुरुत्वाचा हक्क कोणाला आहे ? ब्रह्मसंबंधाची दीक्षा वाटेल त्या गुरूकडून किंवा शास्त्री पंडिताकडून घेतां येते किंवा काय ?' हा प्रश्न येथें उद्भवतो. याचें निराकरण सांप्रदायिक ग्रंथकारांनीं अगोदर करून ठेवलें असून त्यायोगें तो वाद मिटविला आहे. **श्रीवल्लभाचार्यां**नी स्वप्रणीत ग्रंथातून गुरूचीं जीं लक्षणें दिलीं आहेत, त्यांत ते स्वतःच्या वंशांतील बालकांना वैष्णवानें गुरु करावा असें म्हटलेलें आम्हांस आढळत नाहीं; परंतु त्याच कुलांतील बालकांनीं ज्यांना पुढे मोंगल बादशाहाकडून ' गोस्वामि ' ही मान्यतेची पदवी देण्यांत आली त्यांनीं हा हक्क आपणाकडे राखून ठेवला असें त्यांच्या ग्रंथावरून अनुमान काढतां येतें; कारण त्यावेळीं **श्रीवल्लभाचार्यांचे** द्वितीय कुमार **श्रीविठ्ठलनाथजी** ज्यांना संप्रदायांत श्रीगुंसाइजी ( गोस्वामि ) असें म्हणतात, त्यांनीं या संप्रदायाचा प्रसार सर्वत्र केला. तसेंच त्यांच्या वंशजांनीं सुद्धां अति परिश्रम करून कुलाचें पवित्र्य राखलें; म्हणून हा हक्क वंशपरंपरा-गत त्यांच्या कुलाकडेच चालत आला. त्यावेळीं **श्रीवल्लभबालक** ही दीक्षा देण्यास योग्य होते, तरी सुद्धां या बालकांनीं आपल्या पित्याच्या उज्ज्वल नांवावरच दीक्षा देण्याची प्रथा सुरू केली; वास्त-विक गुरु फक्त **श्रीवल्लभाचार्य** हे होत. हल्लीं त्यांचा आविर्भाव नसल्यामुळें ती दीक्षा त्यांच्या गोस्वामि बालकांकडून घेतली जाते. दीक्षा घेताना त्या गोस्वामि बालकाचे ठिकाणीं ' साक्षात् **श्रीवल्लभप्रभूच**

मला ही दीक्षा देत आहेत ' अशी प्रत्येक विचारी वैष्णवानें भावना ठेवावी.

**"ब्रह्मसंबंधकरणं नाम एतन्मार्गीयाचार्यद्वारा भगवन्निवेदनम्।"**
**( चतुर्थ गोकुलनाथजी )**

ब्रह्मसंबंध करणें म्हणजे खास ' एतद् ' म्हणजे पुष्टिमार्गीय आचार्यद्वारा भगवंताला निवेदन करणें होय. या पुष्टिमार्गाचे आचार्य तर फक्त **श्रीवल्लभप्रभू**च आहेत, व तेच गुरु होत. श्रीहरिरायजींचे पिता **श्रीकल्याणराय**जी यांनीं सुद्धां ' स्वमार्गीयाचार्यद्वारा ' याचा अर्थ पुष्टिमार्गीय आचार्यद्वारा असाच केला आहे. तसेंच यापुढें झालेले श्रीव्रजोत्सवजी ब्रह्मसंबंधाची व्याख्या देतांना म्हणतात—

**"ब्रह्मसंबंधकरणं नाम साक्षात् पुरुषोत्तमसंबंध करणम् ।**
**तच्च श्रीमदाचार्यद्वारा शरण गमनपूर्वकम् ॥**

ब्रह्मसंबंध करणें म्हणजे साक्षात् पुरुषोत्तमसंबंध करणें होय. व तें शरण्य श्रीमदाचार्यद्वाराच झालें पाहिजे. याचा अर्थ ज्या गुरूकडून ब्रह्मसंबंध घ्यावयाचा त्याचे ठिकाणीं श्रीमद्वल्लभाचार्यच आपणास ब्रह्मसंबंध देत आहेत असें समजलें पाहिजे. व हे गुरु त्यांचेच वंशज होत.

**निवेदनं तु स्मर्तव्यमित्यत्र । अत एव श्रीमदाचार्यवंश्यानां नान्यमार्गीयप्रतिग्रहाङ्गीकारः ॥** ( श्रीगोकुलोत्सवजी )

'निवेदन तें हेंच कीं श्रीवल्लभाचार्यवंशद्वारा ईश्वरार्पण करणें. अन्यमार्गानें जर कोणी ब्रह्मसंबंध ग्रहण करील तर पुष्टिमार्गांत त्याचा अंगीकार होत नाहीं " यासाठीं ब्रह्मसंबंध श्रीवल्लभकुलद्वाराच घेतला पाहिजे, हें आतां सिद्ध झालें, ज्या गोस्वामि बालकाकडून

ब्रह्मसंबंध घ्यावयाचा ते साक्षात् श्रीवल्लभप्रभूच आहेत, अशी भावना ठेवली म्हणजे कोणतीहि आडकाठी येत नाहीं. कारणः–

“ **स्ववंशे स्थापिताशेषमहात्माय नमः** । ” ( श्रीव्रजोत्सवजी. )

श्रीवल्लभाचार्यांनी आपल्या स्वताच्या वंशांतूनच या पुष्टिमार्गाचें अशेष माहात्म्य स्थापन केलेले आहे. तेव्हां त्यांचे वंशज गोस्वामिबालक हे वैष्णवांचे गुरु होत, व त्यांना गुरुस्थानीं कल्पून त्यांजकडून हल्लीं दीक्षा घेतली पाहिजे. आजच्या आचार्यवंशांत हळुहळू विद्येचा, भक्तीचा, व ज्ञानाचा ऱ्हास होत आहे त्यामुळें हा संप्रदाय हास्यास्पद होऊं पाहात आहे; परंतु गुरूचें कार्य जर त्याच्या योग्यतेला शोभेसें नसेल तर तें न करण्याबद्दल गुरूस सांगण्याचा व त्याचें मन वळविण्याचा हक्क शिष्याचा आहे, हें आपण मागें पाहिलेंच व याउपरहि जर गुरु ऐहिक सुखाला बळी पडून भक्ति विमुख झाला तर प्रभूच त्याची त्या गुरुस्थानावरून उचलबांगडी करून त्याची अधोगति करतात. याचें स्पष्ट उदाहरण हल्लीं आपण पाहात आहोंत. दामोदरलालजी विद्वान खरे, परंतु जेव्हां ते भक्ति पराङ्मुख झाले व आपल्या कर्माचा त्यांना विसर पडला, इतर शिष्यांनीं त्यांच्या अनेक समजुती घातल्या तरी ते शुद्धीवर आले नाहींत. तेव्हां प्रभूलाच हे न आवडून त्यानें आपल्या पीठाच्या मुख्य स्थानावरून त्यांना हाकलून दिलें. अर्थात् ते पदच्युत झाले. मुख्य पीठाधीश्वर हे दामोदरलालजी जर असे तर त्यांचा संप्रदाय कसा असला पाहिजे ? हा प्रश्न उद्भवतो; परंतु हा व्यक्तिदोष आहे. संप्रदायाचा दोष नाहीं. संप्रदायाचें यांत कोणतेंहि नुकसान नाहीं. संप्रदायाला गालबोट लावणें हें उचित नाहीं. ते गुरु गेले तर त्यांच्यापेक्षां शतपट लायक गुरु या संप्रदायाला मिळतील. व्यक्तिदोषामुळें संप्रदाय कांहीं नामशेष होणें शक्य नाहीं. किंवा त्यामुळें संप्रदाय दूषित ठरत नाहीं.

**(२०) पत्रद्वारा ब्रह्मसंबंधः—**

पूर्वी वाहतुकीचीं साधनें अल्प प्रमाणांत असल्यानें गुरूची प्रत्यक्ष भेट होणें मुष्कीलीचें असे. तेव्हां ज्याला ब्रह्मसंबंध घ्यावयाचा असेल त्यानें प्रथम **श्रीवल्लभाचार्यांच्या** वंशजांस विनंती केली म्हणजे ते त्यास पत्रद्वारा या ब्रह्मसंबंधाचा उपदेश करीत. व अशा रीतीनें पुष्टिमार्गाची त्याला दीक्षा देत. असा '८४ व २५२ वैष्णववार्ता' या ग्रंथांतून उल्लेख दिसून येतो.

**(२१) अर्पण कोणास करावयाचें ?—**

ब्रह्मसंबंधाच्या मंत्राविषयी कित्येकांची अशी समजूत आहे की, सर्वस्व गुरूलाच म्हणजे या मार्गातील महाराजानांच अर्पण केले जातें. परंतु यांत श्रीकृष्णाला—पूर्णपरब्रह्मपुरुषोत्तमालाच अर्पण करण्याचा उपदेश आहे. महाराजांना किंवा गुरूंना यांत कांहीहि अर्पण करावयाचे नसते. या मंत्रांत महाराजांना देह, स्त्री, पुत्र, आप्त, द्रव्य वगैरे अर्पण करण्याची सूचनाहि पण नाहीं. **चतुर्थ श्रीगोकुलनाथजींची** टीका निःसंदिग्धभाषेंत पुनः पुनः भगवान् **श्रीकृष्णालाच** अर्पण करण्याचा उपदेश करिते. सिद्धांतरहस्यातहि **श्रीवल्लभप्रभु** हीच आज्ञा करितात. या आत्मनिवेदनानें जो संबंध जोडला जातो तो प्रभूशी; आचार्याशी नव्हे. अन्यथा तो आचार्यसंबंध म्हटला गेला असता. अगर आचार्यनिवेदन म्हटलें गेलें असतें. आचार्य किंवा आचार्यकुल हे ब्रह्मसंबंध देणारे गुरु होत—द्रष्टे होत—मार्गदर्शक होत. मंत्रद्वारा प्रभूला सर्वस्व अर्पण करविणारे प्रभूचे परमभक्त होत. अर्पण स्वीकारणारे तर **श्रीकृष्ण** आहेत. हा मंत्र परमात्मा व जीवात्मा यांचा अन्योन्य संबंध दर्शवितो, अर्पण करणारा जीवात्मा व ज्याला अर्पण करावयाचें तो परब्रह्म परमात्मा आहे; परंतु कोणतीहि लौकिक व्यक्ति नाही, हें विसरतां कामा नये. सारांश, हें सर्व समर्पण प्राकृत नराला नाहीं; नरश्रेष्ठाला नाहीं; प्रकृतीच्या

गुणांची जी अधिष्ठात्री देवता तिला नाहीं, अक्षर ब्रह्माला नाहीं. परंतु ज्या तत्त्वाला वेद अक्षरातीत, आनंदाकार ‘ **रसो वै सः** ’ असें म्हणतात त्याला हें अर्पण आहे.

**(२२) आत्मनिवेदनाचा अधिकार सर्वांना आहे काय ?:—**

मनुष्य वाटेल तितका पापी असो, पण तो एकदां अनन्यभावें प्रभूस शरण गेला म्हणजे त्यावर प्रभु अनुग्रह करतात. “ अरे तूं पाप्यापेक्षां जरी महापापी असलास तरी मी तुझा उद्धार करीन ” असें आश्वासन व अभयदान भगवान् **श्रीकृष्ण** देतात.

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः॥** (गी. ९--३०)

“ मोठा दुराचारी कां असेना; मला जर तो अनन्य भावानें भजत आहे, तर तो साधुच समजला पाहिजे. कारण त्याच्या बुद्धीचा निश्चय चांगला झालेला असतो. ” यावरून हें स्पष्ट होतें कीं, जो **श्रीकृष्णाला** अनन्यभावानें शरण जातो—मग तो पापी असो, किंवा महापापी असो त्याला उत्तम गति प्राप्त होतें. ‘ **सर्वेऽधिकारिणोह्यत्र विष्णुभक्तौ यथा नृप** ’—हे राजन् ! विष्णुभक्ति करण्याचा अधिकार सर्वांना आहे. आणि हें आत्मनिवेदनसुद्धां या भक्तीचें अंतिम अंगच आहे. वेद पढण्याचा किंवा वेदोक्त कर्म करण्याचा अधिकार त्रैवर्णिकांना आहे; परंतु हा ब्रह्मसंबंध घेण्याचा अधिकार शूद्रांनासुद्धां सारखाच आहे. यांचा जर प्रभु उद्धार करतात तर त्रैवर्णिकांचा सुद्धां उद्धार करतील यांत काय संशय ?

पूर्वीं औरंगजेबाचे राजवटींत साठ वर्षाचा मिरझा अबदूल कादिर या नांवाचा एक इसम होता, त्याला महात्मा **विठ्ठलदासांनीं** मधुपुरींत शुद्ध करून त्याचें नांव ‘चंद्रनयन’ असें ठेविलें. हिंदुत्व स्वीकारल्यानंतर या गृहस्थानें रामायणाचा फारसी भाषेंत अनुवाद केला आहे.

तसेंच शहाजहानच्या अमदानींत रुस्तुमखां नांवाच्या एका पठाणास **श्रीविठ्ठलनाथजीनी ' श्रीकृष्णः शरणं मम '** मंत्राचा उपदेश करून आपल्या संप्रदायांत दाखल केलें. त्यानें रसखानी नांव धारण करून अनेक सुरस भक्तिपर काव्यें रचिलीं आहेत. त्याचप्रमाणें परमभक्त रसखान ह्याचे श्रीकृष्णावर निहेर्तुक प्रेम दिसून आल्यावर **श्रीगुसाईं-जीनीं** म्हणजे **श्रीविठ्ठलनाथजीनीं** त्याला पुष्टिमार्गाचा धर्म कथन केला. याचा जन्म मोंगल बादशहांच्या राजकुटुंबांत झाला होता. रुस्तुम-खांप्रमाणेंच ताजबेगम नांवाच्या एका मुसलमान स्त्रीनें हिंदुधर्म स्वीकारला. ही ताजबेगम एक लावण्यवती पंजाबी हिंदु युवती होती. राजा अकबरानें तिला दिल्लींत आणली व तिला मुसलमानधर्मांत घेऊन तिजबरोबर लग्न लावलें; परंतु तिचा हिंदुधर्माकडे ओढा व शुद्धभाव पाहून अकबरानें तिला हिंदुधर्म स्वीकारण्यास परवानगी दिली. तिचा असा शुद्धभाव पाहिल्यानंतर **श्रीगुसाईजींनीं** तिला शरणमंत्राचें रहस्य सांगून भक्तिमार्गाचा उपदेश केला. या ताजबेगमची मैत्रिण-बिरबलाची मुलगी हिलासुद्धां **श्रीगुसाईजींनीं** पुष्टिमार्गाचा उपदेश केला होता. या ताजबेगमचा कुराणावरील विश्वास उडाल्यानंतर तिनें श्रीकृष्णा-बर अत्यंत हृदयस्पर्शी अशीं अनेक कवनें रचिलीं आहेत. तसेंच अलिखान पठाण, मोहन भंगी वगैरे मंडळींना या संप्रदायात दाखल करून पुनीत केल्याचे दाखले सांपडतात. तेव्हा या आत्मसमर्पणांत सर्व प्राणीमात्रांना सारखाच अधिकार आहे. भगवंताला सर्वस्व अर्पण करण्यास जो तयार होतो, त्याला या मार्गाची दीक्षा घेण्यास योग्य गणलें आहे. या पुष्टिमार्गाचें द्वार भगवन्नामानें आकृष्ट झालेल्या भक्ताला—मग तो कोणीहि असो,—उघडे आहे, व हेंच या मार्गाचें उत्कर्षाचें कारण आहे. ज्याप्रमाणें सूर्यप्रकाश व शुद्धवायु यांचा उपयोग करण्याचा सर्व प्राणीमात्रांना समान रूपाचा अधिकार आहे, त्याचप्रमाणें हें आत्मनिवेदन किंवा ब्रह्मसंबंध

घेण्याचा अधिकार सर्वांस आहे. **श्रीवल्लभाचार्योनीं** अन्य धर्मीयांनासुद्धां आपल्या उपदेशानें या धर्माची गोडी लावून त्यांना प्रभुभजनानंदाचा मार्ग दाखवून दिला; एवढेंच नाही तर दिङ्मूढ झालेल्या आर्य जनतेंत भक्तिमार्गाचा प्रसार करून त्यांना योग्य मार्गावर आणलें. **श्रीमच्छङ्कराचार्यानंतर** हिंदुधर्मावरील कीट काढून त्याचे नूतन परिस्थित्यनुसार नवसंस्करण करण्याचा ज्या आचार्यांनी व साधुसंतांनीं मान मिळविला त्यांत **श्रीवल्लभप्रभु** हे अग्रगण्य होत. भरतखंडात पर्यटन करून लक्षावधी लोकांना हिंदुधर्माची गोडी जर कोणी लावली असेल तर ती **श्रीवल्लभाचार्यां**नीच. भरतखंडाच्या धार्मिक विकासक्रमाच्या इतिहासांत सोळावे शतक अद्वितीय आहे. याच शतकांत चोहींकडे भक्तिचा तरंग उसळला व प्राचीन वैदिक धर्माला पुनर्जीवन मिळालें. **चैतन्यप्रभूच्या** उपदेशानें बंगाल जागृत झाला, तर इकडे उत्तरहिंदुस्तानांत **श्रीवल्लभाचार्यांच्या** अलौकिक प्रभावानें भक्तिरसाचे फवारे उडूं लागले.

**( २३ ) दीक्षाविचार:—**

कोणत्याहि धर्मांत, पंथांत किंवा संप्रदायांत प्रत्येकाला त्या त्या धर्माची किंवा संप्रदायाची दीक्षा दिली जाते. ख्रिस्ती धर्मांत बाप्तिस्मा विधि करावा लागतो. मुसलमानांत सुंता करावी लागते; त्याशिवाय तो ख्रिस्ती किंवा मुसलमान ह्मटला जात नाही. तसेंच या हिंदुधर्मांतगत वैष्णव संप्रदायांत ब्रह्मसंबंधाची दीक्षा दिली जाते. दीक्षा देण्याची ही प्रथा आपल्या देशांतच आहे असें नाही. तर जगाच्या सर्व धर्मांत आहे. जसे बाप्तिझ्माशिवाय एकाद्या ख्रिस्ती गृहस्थाला त्या धर्माचा अनुयायी मानला जात नाही. तसेंच या किंवा अन्य संप्रदायांत एकदा विवक्षित संस्कार केल्याशिवाय तो त्या धर्माचा किंवा संप्रदायाचा अनुयायी ह्मटला जात नाही, व अशा संस्कारानें तो त्या धर्माच्या आज्ञेनुसार आपलें जीवन व्यतीत करीत असतो. या पुष्टिमार्ग संप्र-

दायांत 'ब्रह्मसंबंध' हा प्रथम संस्कार आहे, व या संस्कारानंतरच तो भगवत्सेवेस अधिकारी समजला जातो. हा समर्पणाचा विधिमंत्र कोणता हें आपण मागें पाहिलेंच आहे.

श्रीवल्लभकुलाचे वंशज गोस्वामी महाराज जे गुरुस्थानी आहेत, ते ब्रह्मसंबंधाच्या मंगल मंत्रद्वारा शिष्याला त्याचा देह... पुत्रादि सर्व ईश्वरार्पण करण्यास सांगतात. व त्या वेळेस 'तुझें तें सर्व प्रभूचें झालें. सर्वसमर्थ प्रभूला तुझी आतां चिंता. तुझे सर्व पदार्थ आतां प्रभूकारणेंच उपयोगांत येतील. तुझ्यावरील इहलोक परलोक या संबंधीं सर्व सत्ता प्रभूच्या हातीं आहे.' असा उपदेश करितात.

हल्लीं ब्रह्मसंबंधाचा विधि नाममात्रच उरलेला आहे. गुरूला दोन रुपये दहा आणे दक्षिणा दिली म्हणजे झाला ब्रह्मसंबंध! अशी क्रिया मात्र चालू आहे. काकडीचें बीं पेरून आम्रफलाची आशा करणें योग्य आहे काय? ज्यांना ब्रह्मसंबंधाची दीक्षा घ्यावयाची असते ते वैष्णव त्यातील रहस्य जाणण्याची इच्छा करीत नाहींत. व गुरूहि याबाबतीत उदासीन असल्यामुळें त्याची दरकार किंवा पर्वा बाळगीत नाही. यामुळें स्वतःच्या धर्मासंबंधी अज्ञानतेचा प्रसार मात्र आपोआप होत आहे. जोंपर्यंत त्या मंत्राच्या फलस्वरूपाचा विचार केला जात नाही, तोंपर्यंत फलप्राप्ति कशी होणार? जर वैष्णव गुरुद्वारा योग्य विधिवत् ब्रह्मसंबंधाची दीक्षा घेतात, तर मग त्यांना प्रभुप्राप्ति कशी होत नाहीं? याचें उत्तर हें की, जो ज्या भावनेनें प्रभूला आत्मसमर्पण करितो त्या भावनेनेंच प्रभु त्याला फल देत असतात. स्वाती नक्षत्राचे पावसाचे थेंब ज्या शिंपल्यावर पडतात, त्या शिंपल्याच्या गुणावगुणावर मोतीं उत्तम तेजदार अगर निस्तेज उपजतात. कारण, सर्व आधार पात्रापात्रावर अवलंबून आहे. वैष्णवाला पात्र करण्यासाठींच त्याला भगवन्नामस्मरण व त्याचें शरण्य स्वीकारण्यास या मार्गांत प्रथमारंभीं उपदेश केला आहे. तेव्हां भक्त जितका अधिकारी असेल त्याप्रमाणें प्रभु अनुग्रह

करतात, व दर्शनसुख देतात. परंतु हल्लीं तर धर्मपराङ्मुखता विशेष दृग्गोचर होते. शास्त्रावर अरुचि व धर्मावर अश्रद्धा उत्पन्न झाली आहे. 'धर्म हें थोतांड आहे' असें वाटूं लागलें आहे. शास्त्रनिरीक्षण हें एक वेडेपणाचें खूळ समजलें जातें. ते जुन्या मतवाल्यांनीं करावे असें नव-मतवादी म्हणूं लागले आहेत. परतु अलिकडे महत्प्रयामानें आम्हां हिंदूंना जेव्हां गोऱ्या कातडीच्या विद्वान् लोकांनीं हिदुधर्म किती श्रेष्ठ आहे हें पटवून दिले व त्यांतील तत्वज्ञान किती उच्च दर्जाचें आहे असें सांगितलें, तेव्हां कोठे आपणास आपला धर्माभिमान, धर्मजिज्ञासा व त्यांत अभिरुचि वाटूं लागली आहे. आमचाच धर्म परकीयांनीं आम्हांस शिकवावा हे खरोखर शोचनीय व लांच्छनास्पद नव्हे काय ? असो.

## ( २४ ) दीनता किंवा दास्यत्वबुद्धिः—

आत्मनिवेदन करतांना कोणती भावना जिज्ञासु वैष्णवानें ठेविली पाहिजे या बाबतींत भागवतकार म्हणतात–' **दास्येनात्मनिवेदनम्**'– ( ११–११–३५ ) 'दास्यत्वबुद्धीनें आत्मनिवेदन कर.' येथे दास्यत्वबुद्धि म्हणजे लौकिक दास्यत्वबुद्धि नव्हे. कारण ती तामसी असते. हे विसरतां कामा नये. येथें तर प्रभूबरोबर अंशांशी भावनेचा संबंध आहे. प्रभु हा अखिल ब्रह्मांडाचा नायक आहे, ईश आहे, हा आमचा पिता, रक्षक, स्वामी व सर्वस्व असून आम्ही त्याचे दास किंवा सेवक आहोंत, हा जो विचार तो कोणत्याहि अर्थानें तामसी होऊं शकत नाहीं. ही शुद्ध सात्विक भावना आहे. या भावनेंत वैराग्य व ज्ञान ओतप्रोत भरलें आहे. कारण, दास्यत्वबुद्धीनें " **भक्तानां दैन्यमेवैकं हरितोषणसाधनम्** । " ( फलप्रकरण, सुबोधिनी ). किंवा दीनतेनें म्हणजे अत्यंत लीन होऊन केलेल्या प्रार्थनेनें प्रभु संतोष पावतात. वास्तविक हा आत्मसमर्पणाचा दर्जा

ऐहिक दास्यत्वभावापेक्षां उच्च आहे. त्यांत गुलामवृत्ति नसून प्रभूचें सेवकत्व स्वीकारलें आहे.

## ( २५ ) निवेदन, अर्पण व दान यांतील भेदः—

' निवेदन ' म्हणजे जी वस्तु ज्याची आहे, त्याचीच त्यावर सत्ता किंवा स्वामित्व कबूल करणें. ' निवेदन ' शब्दांत सागणें, जाणणें किंवा विदित करणें, असा अर्थ भरलेला आहे. म्हणून आत्मा निवेदन केला जातो. आत्मनिवेदनानें द्रव्यादिकांवरील प्रभूचें स्वामित्व कबूल केलें जाते. आणि ' ती वस्तु प्रभूची आहे. त्याची त्यावर सत्ता आहे,' म्हणून प्रभुअर्थीच त्या वस्तूचा उपयोग करावयाचा असतो. हा त्याचा गर्भितार्थ आहे. व ' अर्पण ' म्हणजे जी वस्तु ज्याची असेल ती त्याच्या स्वाधीन करणे. प्रभुसमर्पण केलेल्या वस्तूचा उपयोग अर्पण करणाऱ्यास करतां येतो. आणि ' दान ' म्हणजे आपल्या वस्तूवरील सत्ता उठवून त्यावर दुसऱ्याची सत्ता किंवा स्वामित्व स्थापन करणें. दान केलेल्या वस्तूचा उपयोग दात्याला करतां येत नाहीं. आपण प्रभूला आत्मा निवेदन करितों, नैवेद्य अर्पण करितों, व सुपात्राला दान करतों. तेव्हां निवेदन व दान यात फरक हा आहे की, निवेदनांत दिलेली वस्तु ती 'प्रसाद' म्हणून उपयोगांत आणतां येते; परंतु दानांत दिलेली वस्तु परत घेतां येत नाहीं किंवा त्याचा उपयोग करतां येत नाहीं.

## ( २६ ) आत्मनिवेदनानें दोषनिवृत्ति कशी होते ?:—

**ब्रह्मसंबंधकरणात् सर्वेषां देहजीवयोः ।**

**सर्वदोषनिवृत्तिर्हि दोषाः पंचविधाः स्मृताः ॥ २ ॥**

**सहजा देशकालोत्था लोकवेदनिरूपिताः ॥**

**संयोगजाः स्पर्शजाश्च न मंतव्याः कथंचन ॥३॥** (सि. र.).

" ब्रह्मसंबंध घेतल्यानें सर्व पदार्थमात्र, देह व जीव या सर्वांचे दोष निश्चयपूर्वक नाहींसे होतात. दोष पांच प्रकारचे आहेत:—

(१) **सहज दोष**–देहापासून उत्पन्न होणारे, शूद्र चांडालादि हीनजातींत जन्म होणें.

(२) **देशोत्थ दोष**–देशापासून उत्पन्न होणारे. पूजास्थान अपवित्र असणें, म्लेंछांच्या राज्यांत राहाणें.

(३) **कालोत्थ दोष**–समयाला अनुसरून उत्पन्न होणारे, कलिकाल किंवा अशुभ मुहूर्त असणें.

(४) **संयोगज दोष**–संयोगापासून उत्पन्न होणारे, पतित (पापी) यांचा संगदोष किंवा समागम होणें.

(५) **स्पर्शज दोष**–स्पर्शापासून उत्पन्न होणारे. अस्पर्श वस्तु, पशु किंवा प्राणी यांच्या स्पर्शापासून होणारा दोष. असे वेदांत व लोकांत म्हणजे स्मृतींत निरूपण केलें आहे.

जोपर्यंत भक्तिमार्गांत प्रवेश होत नसतो तोंपर्यंत हे दोष बाधक होत असतात; परंतु भक्तिमार्गांत प्रवेश करण्यासाठीं ब्रह्मसंबंधाची दीक्षा घेतली म्हणजे ह्या सर्व दोषांची निवृत्ति होते. 'देहजीवयोः' म्हणजे देहाचा व जीवाचा ब्रह्माबरोबर संबंध झाला म्हणजे देहाचें अंगरुप इंद्रिय, आप्तवर्ग व स्वबंधु या सर्वांवरून आपोआपच ममत्व नाहीसें होतें. आणि जीवाचीहि अहंकारयुक्त आसक्ति नाहीशी होते.

अशानें जीवाला स्वरूपाचें पूर्ण ज्ञान होतें. 'मी कोण, माझें कर्तव्य काय' याचें ज्ञान होतें. ब्रह्मसंबंधानंतर अशी भावना झाली पाहिजे कीं, देह, इंद्रिय व स्नेहीवर्ग इत्यादि सर्वांचा माझ्यामुळें ब्रह्माशीं संबंध झाला. ते सर्व आतां प्रभूचे झाले, म्हणून त्यावरील ममत्व काढून प्रभूकारणें त्यांचा संबंध होईल तो संबंध खरा निर्दोष होय.

ऱ्या ब्रह्मसंबंधाचा उपदेश गुरुदेवाजवळूनच घेतला म्हणजे दोषनिवृत्ति होऊन भगवत्सेवा करण्याचा मनुष्यास अधिकार प्राप्त होतो. मग वरील पांच दोष प्रभुसेवेंत कदापि अडचण आणीत नाहींत. कारण निर्दोष पूर्णानंद भगवंताला अर्पण केल्यानें सर्व वस्तु पवित्र होतात. मग ह्या दोषांची निवृत्ति होईल यांत नवल तें काय ?

कर्म, ज्ञान किंवा प्रायश्चित्त यांनी कदाचित् देहाची दोष निवृत्ति होईल. पण जीवाचे दोष निवारण करण्याचें सामर्थ्य यांत नाहीं. प्रभूला निवेदन केल्याशिवाय सर्व दोषांची निवृत्ति कोणत्याही प्रकारें होत नाही. प्रायश्चित्तानें समूल दोषनिवृत्ति होईलच असें नाहीं. परंतु ब्रह्मसंबंध–उपदेशमंत्र हे प्रायश्चित्ताचें आधिदैविक स्वरूप असल्यामुळें सर्व दोषांची तत्काळ निवृत्ति होते. तसेच ज्ञानानें सुद्धा दोषनिवृत्ति होणें जरी शक्य असले तरी तें कष्टसाध्य आहे. कारण या कलिकालात तीव्र वैराग्याशिवाय ज्ञान होणे अशक्य आहे. त्यामुळें ज्ञानानें दोषनिवृत्ति करण्याची आशा करणें निरर्थक आहे. प्रभूला सर्व समर्पण केल्याने वस्तु दोषरहित होतात, व त्यानेच निर्दोषत्व प्राप्त होतें. ब्रह्मसंबंधानें पूर्वीची सर्व पापें दग्ध होऊन त्याचा देह व जीव शुद्ध होतात. त्याचे सर्व व्यवहार प्रभुप्रीत्यर्थच होत असल्यामुळें त्याच्याकडून पापकर्मे होत नाहींत. आणि अहंकारयुक्त आसक्ति सुटल्यामुळें कोणतेंहि कर्म त्याला बंधनकारक होत नाहीं भगवान् **श्रीकृष्ण** म्हणतात—

**ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ गी. ५–१०॥.**

“ ब्रह्माचे टायीं अर्पण करून आसक्तिविरहित जो **कर्मे** करितो त्याला, कमळाच्या पानाला जसें पाणी, त्याप्रमाणें पाप चिकटत ( लागत ) नाहीं.” हीच दोषनिवृत्ति होय. म्हणूनच

" **ब्रह्मसंबंधः सर्वदोषनिवर्तकः** " म्हटलें आहे. प्रभु दोषरहित व सम आहे. त्याचा संबंध व समागम झाल्यानें जीव पण दोषरहित होतो. तो प्रभुसान्निध्याच्या वातावरणांत विहार करितो. जसे परिसाच्या समागमानें लोखंडाचें सोनें होतें, तसेंच सत्समागमानें-प्रभूच्या उत्तम समागमानें-ब्रह्मसंबंधानें तो मनुष्य ब्रह्मय होतो यांत नवल तें काय ? कारण " **समर्पणेनात्मनो हि तदीयत्वं भवेद्ध्रुवम्** " ॥१८॥ (बालबोध) देह, प्राण, आत्मा, अंतःकरण सर्व कांहीं प्रभूला अर्पण केल्यानें जीव निःसंशय तदीय होतो. तसेंच **श्रीवल्लभाचार्य** ' निरोध लक्षण ' नामक ग्रंथांत ह्मणतातः—

**संसारावेशदुष्टानामिंद्रियाणां हिताय वै ॥**
**कृष्णस्य सर्ववस्तूनि भूम्न ईशस्य योजयेत् ॥ १२ ॥**

"संसारामुळे दुष्ट झालेल्या इंद्रियाच्या कल्याणासाठी सर्वव्यापी आनंदमय प्रभु **श्रीकृष्णाचे** ठिकाणीं सर्व वस्तूंचा उपयोग करावा " कारण पुष्टिमार्गांत इंद्रियाचें निर्दोषत्व सिद्ध करण्यासाठीं सर्व पदार्थ भगवंताला अर्पण करावे असा स्पष्ट आदेश आहे.

कित्येक अज्ञानी वैष्णवांची अशी समजूत आहे कीं, ' ब्रह्मसंबंध घेतला कीं लागलीच दोषनिवृत्ति होते. अगोदर अनेक पापकृत्यें करावीं व नंतर ब्रह्मसंबंध घ्यावा ह्मणजे झालें'. परंतु हें त्यांचें म्हणणें साफ चुकीचें आहे. अशाच तऱ्हेची वृत्ति सोळाव्या शतकांत युरोपांतील लोकांची होती. जेव्हां पोपचा हस्तक पापविमोचनाचे पास (Indulgences)घेऊन ते विकण्यासाठीं जर्मनींत आला. व 'धर्मखात्यास देणग्या दिल्यानें पापक्षालन होतें, ' अशी त्यानें लोकांना शिकवण दिली; तेव्हां या त्याच्या वृत्तीला धर्मसुधारक ल्युथरनें (इ.स.१४८३ –१५४४) कसून विरोध केला. ह्मणून पोपनें त्यास बहिष्कृत केलें. त्याच (Indulgences) प्रमाणें हा ब्रह्मसंबंध आहे, असें कोणी ह्मणूं

लागल्यास त्याला या ब्रह्मसंबंधाचें तत्वच कळलें नाहीं, असें ह्मणावें लागतें. हा ब्रह्मसंबंध ह्मणजे दोषनिवृत्तीचा कांहीं पास नाहीं. यांत कोणताहि स्वार्थ हेतु भरलेला नाही. यानें केवल 'मोक्षप्राप्तीचा मार्ग कोणता, प्रभूशीं जीवाचा संबंध कसा आहे व तो जाणला ह्मणजे मनुष्य कसा आपोआप दोषरहित होतो व त्यामुळें त्याला प्रभुसेवेंत अधिकारप्राप्ति कशी होते, हें दर्शविण्याचें एक सरल साधन आहे. त्याचा जर विपरीत अर्थ करून कोणी वैष्णव दुरुपयोग करूं लागला तर हा दोष तत्त्वाचा नसून व्यक्तीचा आहे. शस्त्र व विष हीं जशी मारक आहेत तशीच तीं तारकहि आहेत; पण योजकाच्या चातुर्यावर किंवा अज्ञानपणावर त्यांचा हितकारक किंवा अहितकारक परिणाम अवलंबून असतो. 'ब्रह्मसंबंध' झाला ह्मणजे आपण दोषनिवृत्त झालों, आयुष्याची इतिकर्तव्यता संपली, आता आपणांस कांहीं करावयाचें राहिलें नाहीं, असे मुळीच नाहीं. असें म्हणणारा प्रभूला फसवित असतो पण प्रभु असे फसत नसून तोच मात्र फसतो. आपलें आत्मनिवेदन किंवा ब्रह्मसंबंध ठकबाजीचें तर त्याचें दान पण ठकबाजीचेंच असावयाचें, हें निर्विवाद होय. ब्रह्मसंबंधानंतर जर कांहींच करावयाचें नसतें तर **श्रीवल्लभाचार्यांनीं** किंवा त्याच्या विद्वान् अनुयायी **गोस्वामी** महाराजांनी ग्रंथलेखनाचा प्रयासच केला नसता. ते ब्रह्मसंबंधानंतर स्वस्थ ऐषाराम करीत बसले असते; परंतु तशी वस्तुस्थिति नाही. ब्रह्मसंबंधानंतर पुष्टिमार्गाचे सिद्धांत समजून घेऊन आपल्या मार्गानुसार पवित्र आचरण ठेविलें पाहिजे. ब्रह्मसंबंधाचा उपदेश निष्क्रिय बनवीत नसून धर्मपरायण बनवितो व कृष्णार्पण बुद्धीनें कार्य करण्यास सांगतो. यांत स्वतःची धर्मनिष्ठता व कर्तव्यपरायणता चालू ठेवलीच पाहिजे. आपलें कर्तव्य काय असावें हें गुरूला विचारून त्याच्या आज्ञेनुसार प्रभुसेवा करावी हेंच यांत शिकविलें जातें. आत्मनिवेदनानंतर भागवत धर्माचें सेवन करून प्रभूवर निष्ठा ठेवून.

ती वाढविली कीं लौकिक आसक्तीचा आपोआपच क्षय होतो व त्यांत अरुचि उत्पन्न होते, व ऐहिक दोषांपासून तो मुक्त होतो.

### ( २७ ) आत्मनिवेदन हा एक महान् यज्ञच होयः—

" **स्वर्गकामो यजेत्**—ज्याला स्वर्ग मिळवावयाचा असेल त्यानें यज्ञ करावा. अशी वेदाज्ञा आहे. ' यज्ञसंस्था ' ही वैदिक आर्यांचें वैशिष्ट्य आहे. यज्ञाशिवाय सुखप्राप्ति व दुःखनिवृत्ति होत नाहीं. गीतेंत भगवान् **श्रीकृष्ण** म्हणतात—

"**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम** । (गी. ४–३१)

यज्ञ न करणारास इहलोक (सिद्ध होत) नाहीं; मग हे कुरुश्रेष्ठा ! परलोक कोठून (मिळणार) ? " यज्ञ म्हणजे केवळ ज्योतिष्टोमादि श्रौतयज्ञ, किंवा अग्नीत कोणत्याहि द्रव्याचें हवन करणें, एवढाच अर्थ होत नाहीं. सृष्टि निर्माण करून तिचा क्रम सुरळीत चालण्यासाठीं, म्हणजे लोकसंग्रहार्थ, सर्व प्रजेस ब्रह्मदेवानें चातुर्वर्ण्य-विहित जीं जीं कर्में लावून दिलीं आहेत, त्या सर्वांचा ' यज्ञ ' या शब्दांत समावेश होतो." ( गी. र. ६४६ ) " अग्नींत आहुति टाकितांना अखेरीस 'इदं न मम'—हें माझें नव्हे—असे जे शब्द उच्चारितात त्यांतील स्वार्थत्यागरूप निर्ममत्वाचें जें तत्त्व तोच यज्ञांतील प्रधान भाग होय; आणि अशा रितीनें " न मम " म्हणजे ममत्व-बुद्धि सोडून ब्रह्मार्पणपूर्वक आयुष्यांतील सर्व व्यवहार करणें हाहि एक मोटा यज्ञ किंवा होमच होत असून, या यज्ञानें सर्व देवतांची देवता जो परमेश्वर किंवा ब्रह्म त्याचे यजन घडत असतें"(गी.र.६७५)

यज्ञाच्या मूळाशी जी त्यागाची—निर्ममत्वाची कल्पना आहे तीच कल्पना येथे आहे. या आत्मनिवेदनाच्या तत्त्वज्ञानांत असा एक यज्ञ करावयाचा असतो की, तो करण्यास सर्वांना सुलभ व सोपा जावा. तो यज्ञ हा कीं, इंद्रिय व मन यांचा संयमरूपी

अग्नींत होम करून आत्मनिवेदनानें प्रभूला सर्वस्व अर्पण करणे, ब्रह्मार्पणरूपी हा एकच वडा यज्ञ होतो. या आत्मनिवेदनांत अनासक्तीचें तत्त्व शिकविलें जाऊन प्रभुप्रीत्यर्थच मी सर्व कर्में करितों, ही भावना असते. यांत अहंकारानें व ममत्वानें उत्पन्न झालेल्या आसक्तीचा त्याग करण्यांत येतो. समर्पण प्रेमभावानें केलें जातें. अशा भावनापूर्वक समर्पणांत—आत्मनिवेदनांत—वरील सर्व लघु यज्ञाचा समावेश होतो. वैदिक कालांत होत असलेले यज्ञ या कलिकालांत दुःसाध्य झाले तेव्हां **श्रीवल्लभाचार्यांनीं** सर्वांना सुलभ परंतु सर्वश्रेष्ठ असा आत्मनिवेदनरूप महान् यज्ञ करण्याचा उपदेश केला. याप्रमाणें परमेश्वरार्पणपूर्वक सर्व कर्में निष्कामबुद्धीनें करीत राहिलें म्हणजे व्यापकार्थी हा एक मोठा यज्ञच होतो. व त्यायोगें या यज्ञासाठीं केलेलें कर्म बंधक होत नाही. यानें म्हणजे आत्मनिवेदनरूपी महायज्ञानें स्वर्गाच्या येरझारा न घडतां सर्व कर्में ब्रह्मार्पणबुद्धीनें केली असल्यामुळें अखेर मोक्षप्राप्ति झाल्यावाचून राहात नाही.

## ( २८ ) आत्मनिवेदन व कर्मयोगः—

आत्मनिवेदन व कर्मयोग यांत जर कोठें भेद असेल तर तो त्यांच्या प्रवर्तकांच्या विचारश्रेणींत आहे. मान्यवर गीतारहस्यकार **लोकमान्य** निष्काम बुद्धीनें फलाशात्यागपूर्वक कर्में करण्यास सांगतात तर आत्मसमर्पणांत **श्रीवल्लभाचार्य** तीं कर्में परमेश्वरार्पणपूर्वक करावीं म्हणजे कर्म बंधक न होतां मोक्षप्रद होईल, असें म्हणतात. येथें भक्तिदृष्टि आहे. तर गीतारहस्यकारांची निष्काम कर्मफलत्याग दृष्टि आहे. आत्मनिवेदन निष्काम कर्मयोगाची पहिली पायरी होय. कारण निष्काम कर्मयोग साधण्यास आत्मनिवेदन हें केलेंच पाहिजे. त्याखेरीज त्यावरील ममत्वबुद्धि व फलाशात्याग होणार कसे ? आणि या आसक्तीचाच होम त्यांत करावयाचा

असतो. ही त्यागाची दृष्टि आत्मनिवेदनांत परमेश्वरार्पणपूर्वक कर्म करण्यांत प्रतीत होते. ‘ कर्मयोग ’ ही देहाची क्रिया आहे. निष्काम कर्मे करीत राहणें हा देहाचा धर्म होऊं शकतो. शरीरस्थ जीवात्मा पापापासून मुक्त होण्यासाठीं निर्गुण भक्तीचा आश्रय करतो. व तो ज्या पदास मनुष्य गेला असतां परत येत नाहीं अशा ब्रह्मपदीं जाण्याची खटपट या देहादि इंद्रियांकडून करवून घेतो. तो स्वतः अकर्ता असल्यामुळे त्या ठिकाणीं कर्तृत्व संभवत नाहीं; कर्मबंधनांतून कर्माचीं पापें लागूं नये म्हणून देहाला ती फलाशारहित करण्यास सांगून तो त्या पापापासून मुक्त होतो. हें सर्व ब्रह्मार्पण करण्याची बुद्धि उत्पन्न होण्यास परमेश्वराचा विशेष अनुग्रह असल्याखेरीज शक्य नाहीं. म्हणूनच अनुग्रहमार्गानें–पुष्टिमार्गानें–दाखवून दिलेल्या सुलभ पाय वाटेनें तो त्या धामास पोहोंचूं शकतो.

**(२९) आत्मनिवेदन हें नवविधा भक्तीचें अंतिम अंग होय:-**

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।**
**अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥**

( भा ७-५-२३ )

प्रपत्तीनें म्हणजे प्रभूला शरण गेलें म्हणजे क्रमशः श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, व दास्य या सप्तम भक्तीची सिद्धता होते. अर्थात् वरील सात प्रकारचीं भक्ति केल्याचें पुण्य लाभतें; व नंतर ब्रह्मसंबंध झाला म्हणजे अष्टम सख्य व नवम आत्मनिवेदन भक्तीची सिद्धता होते. यांतील एक एक भक्ति मोठ्या श्रमानें व तपश्चर्येनें निरनिराळ्या भक्ताला प्राप्त झाली; परंतु **श्रीवल्लभाचार्यांनीं** सकलजनउद्धारार्थ सर्वांना **‘श्रीकृष्णः शरणं मम’** या मंत्राचें रहस्य सांगून सप्तम भक्तीपर्यंत त्यांची योग्यता

वाढविली. अजामिल वगैरे महान् दुष्टांचें घोर नरकापासून संरक्षण करणारा हा भगवन्नामरुपि मंत्रच होय.

या नऊ प्रकारच्या भक्तींचें प्रथम साधन शरणमंत्र व दुसरें आत्मनिवेदन हें होय. कारण या दोहोंमध्यें त्या सर्वांचा समावेश होतो. अर्थात् एकानें ( शरण मंत्रानें ) सप्तम भक्तीचें व दुसऱ्यानें (आत्मनिवेदनानें) नवमभक्तीचें पुण्य लाभतें. प्रत्येक भक्ति एकापेक्षां एक श्रेष्ठ आहे, व सर्वांत श्रेष्ठ भक्ति म्हणजे 'आत्मनिवेदन' होय. या भक्तिरसाचा आस्वाद घेऊ इच्छिणाऱ्यानें प्रभूला आत्मनिवेदन अवश्यमेव केलें पाहिजे. कारण प्रभुप्रपत्ति व आत्मनिवेदन याशिवाय अन्य विश्वधर्म नाहीं. या आत्मनिवेदनानें प्रभूच्या ठिकाणीं उत्तम भक्ति प्राप्त होते—

**एवं धर्मैर्मनुष्याणामुद्धवात्मनिवेदिनाम् ।**
**मयि संजायते भक्तिः ।** (भा. ११-१९-२९ २४)

"अशा धर्मांचें सेवन केल्यानें मला स्वतःचे सर्वस्व निवेदन करणाऱ्या मनुष्यांना हे उद्धवा ! माझी उत्तम भक्ति प्राप्त होते, व ती भक्ति फलदायक होय."

## ( ३० ) आत्मनिवेदनपूर्वक जीवनः—

**आत्मनिवेदन** हें प्रभूशीं निकट संबंध किंवा ओळख करून देतें, व सेवेला अधिकारी बनवितें. प्रभूच्या आज्ञेनुसार जर त्याचें आचरण नसेल, तर प्रभुप्राप्तीत विलंब होण्याचा संभव अधिक असतो. प्रभुप्राप्ति लवकर होत नाहीं. राजा चांडालीचा अंगिकार करितो; परंतु ती जर पुढें राजघराण्यांत चांडालपद्धतीनेंच वागेल तर राजाला ती अप्रिय होण्याचा संभव अधिक. तिनें राजघराण्यांतल्या रीति रिवाजाप्रमाणेंच वर्तन ठेविलें पाहिजे. तद्वत् मनुष्यानेंहि भगवंताच्या आज्ञेनुसार अर्पणबुद्धीनेंच वागलें पाहिजे. व प्रभूच्या इच्छेनुसार वर्तन

ठेविलें पाहिजे यांतच त्याचें श्रेय आहे. तो आपलें सर्वस्व प्रभूला सोंपवतो व निरिच्छ बनतो. तो आपल्या स्वेच्छेनें मागत नसून स्वामीच्या 'वरंब्रूहि' अशा उक्तीनंतरच मागतो; परंतु स्वामी देत असतांना सुद्धां न घेणें हें उत्तम होय. बळीच्या आत्मसमर्पणापेक्षांहि हें उच्चतम आहे. प्रभु वरदान देत असतांना खरा भक्त ह्मणतो "हे प्रभु ! कोणास तुह्मी वरदान देतां ? मी तर आपलीच वस्तु आहें. कांही देवाण–घेवणानें मला विभक्त कां करतां ? नाथ! वरदान घेऊन मी तें दुसरे कुठें ठेवूं ? जें कांहीं आहे तें आपलेंच आहे.' अशा प्रकारचें आत्मसमर्पण उच्च कोटीचे भक्तच करूं शकतात.

ज्या भक्ताचें अशा प्रकारचें आत्मसमर्पण होतें त्याचें जीवन केवळ लोककल्याणासाठींच राहाते. त्याला कसलाहि अभिमान नसतो. तो लोककल्याणार्थ संचार करीत असतो, व असाच भक्त जीवन्मुक्ति मिळवूं शकतो. अशा पुरुषाच्या दर्शनानें नेत्र, भाषणानें वाणी व चिन्तनानें मन पवित्र होतात, असा जीवन्मुक्त महात्मा सुखदु:ख व लाभहानि, हर्ष व खेद वगैरे द्वंद्वात सांपडत नाहीं. त्याला सर्वत्र समभाव उत्पन्न होतो. त्याला "साहजिकच प्रत्येक वस्तुजात परमेश्वरस्वरूपांत प्रतीत होऊं लागतें. अशा या विश्वतोमुख परमेश्वराच्या दर्शनानें सकळ वृत्ति शांत व स्थिर होतात. निखिल प्राणिमात्राविषयीं अमर्याद प्रेम व अकृत्रिम सुहृद्भाव निर्माण होतो व कर्मानें, मनानें आणि वाचेनें सर्वभूतहित साधण्याविषयीं निस्सीम तत्परता अंगीं बाणते. अशा अवस्थेंत 'माझें सर्व जावो, तुझें नाम राहो' किंवा 'सकळ जन तरावे वशाही उद्धरावे' ह्या अत्युच्च कल्पनेनें प्रेरित होऊन त्या पुरुषोत्तमाच्या भक्तजनांकडून वैयक्तिक सुखाच्या संपूर्ण निरासानें जगदुद्धार घडून आल्याविना राहात नाही." ( गो.शु.इ.४१ ). आत्मसमर्पण करणारा असा भगवद्भक्त प्रभूपासून आपली पृथक् सत्ताच उठवून घेतो. कारण वास्तविक त्याची किंवा

आपली वस्तूच नाही. प्रभूचेंच हें चेतन आहे. प्रभूचेंच हे जड आहे. तोच कर्ता करविता आहे. निमित्ताचा धनी मात्र आपण अशी त्याची भावना झालली असते जो-असें आत्मसमर्पण करितो तोच महात्मा, तोच आम्हांस पूज्य होय. असें जेथें आत्मसमर्पण किंवा आत्मनिवेदन केले जाते तेथें यश व अपयश ईश्वराचेंच होऊन प्रभूंत अनन्य प्रीति उद्भवते. हेच आत्मनिवेदनाचे फल होय.



# रत्न ४ थें

## असमर्पितवस्तुत्याग.

### ( ३१ ) दोन महादोषः—

वैष्णवानें दोन गोष्टीपासून जपले पाहिजे. एक असमर्पितवस्तु व दुसरी अन्याश्रय. असमर्पितवस्तु म्हणजे जी वस्तु प्रभूला समर्पण केली गेली नाहीं ती. व अन्याश्रय म्हणजे परक्याचा आश्रय. या दोषांपासून दूर राहाण्यांस या संप्रदायाचा उपदेश आहे. कारण ते प्रभुप्राप्तींत अडथळे आणतात. येथें आपणांस असमर्पित वस्तूविषयीं विचार करावयाचा आहे. अन्याश्रयाविषयीं पुढील रत्नांत विवेचन करूं.

ब्रह्मसंबंध घेतल्यानंतर वैष्णवाचे सर्व व्यवहार ब्रह्मार्पणपूर्वक होत असतात, हें आपण मागें पाहिलेंच आहे. त्याला ज्या ज्या नवीन वस्तूंचा लाभ होतो, त्या त्या सर्व प्रभूला अर्पण करूनच नंतर तो त्या ‘ प्रसाद ’ म्हणून स्वतःच्या उपयोगांत आणतो. तथापि सर्वच वस्तु समर्पणास योग्य असतात असें नाहीं. तेव्हां समर्पणास योग्य व अयोग्य वस्तु कोणत्या हें अगोदर समजून घेतलें पाहिजे म्हणजे असमर्पितवस्तूंचा त्याग कां करावा हें कळेल. प्रथम समर्पणास अयोग्य वस्तु कोणत्या तें पाहूं:—

### ( ३२ ) समर्पणास अयोग्य वस्तुः—

**“ न मतं देवदेवस्य साभिभुक्तं समर्पणम् ॥ ५ ॥ ”** ( सि. र. )

(१) “देवाधिदेव श्रीकृष्णाला अर्धभुक्त वस्तूचें समर्पण करूं नये.” अर्धभुक्त म्हणजे अर्ध भोगलेला किंवा उपयोग केल्यानंतर अवशेष

राहिलेला भाग, किंवा अर्ध्या प्रमाणांत वापरलेली वस्तु. पुष्कळ वेळां असें होतें कीं, आपण अगोदर वस्तु उपयोगांत आणतो. व नंतर आठवण झाली म्हणजे ती प्रभूला अर्पण करितों अशी वस्तु अर्धभुक्त होय.

( २ ) ज्या वस्तूंचा उपयोग मनुष्यानें अगोदरच केलेला आहे, अर्थात् स्वतः किंवा दुसऱ्यानें वापरलेल्या वस्तु. उदाहरणार्थः—हुंगलेलें फूल, चाखलेलें फल, व वापरलेलें वस्त्र, इत्यादि वस्तु अर्पणास अयोग्य होत.

( ३ ) ज्या वस्तूंचा प्रभु कधींहि स्वीकार करीत नाहीं अशी वस्तु. उदाहरणार्थ— भक्तीविना अर्पण केलेली वस्तु, दुष्ट, पतित व अभक्त अशा मनुष्यानें शिजविलेलें अन्न, कृपण किंवा लोभी मनुष्य व वेश्या यांचें धन, हिंसा करून मिळविलेलें द्रव्य, चोरी किंवा विश्वासघात इत्यादि पापमार्गानें किंवा अनीतीच्या मार्गानें मिळविलेली संपत्ति व कर्जाऊ काढलेला पैसा, मास, अभक्ष्यभक्षण व अपेयपान इत्यादि सर्व वस्तु प्रभूला अर्पण करण्यास अयोग्य होत. पद्मपुराणांतहि असें म्हटलें आहे कीं,——

**अवैष्णवानामन्नं च पतितानां तथैव च ।**
**अनर्पितं तथा विष्णोः श्वमांससदृशं भवेत् ।**
**अनिवेद्य तु यो भुङ्क्ते हरये परमात्मने ।**
**पतन्ति पितरस्तस्य नरके शाश्वतीः समाः ॥**

" अवैष्णवांचे, पतितांचे व श्रीविष्णूला अर्पण न केलेलें असें अन्न कुत्र्याच्या मासाप्रमाणें होय. जो परमात्मा श्रीहरीला अर्पण केल्याशिवाय भोजन करितो त्याचे पितरसुद्धां निरंतर नरकांत पडतात. " वरील मार्गांनीं मिळविलेल्या द्रव्यानें किंवा अन्नानें पुष्ट झालेला महात्मा असला तरी तो बुद्धिभ्रष्ट होतो. याचें उदाहरण

म्हणजे पितामह भीष्माचार्य हे महान् भगवद्भक्त होते. परंतु पापी दुर्योधनाच्या अन्नानें ते मिंधे झाल्यामुळें त्यांची बुद्धिसुद्धां भ्रष्ट झाली होती. द्रौपदीवस्त्रहरणाचे वेळी त्यांनी दिलेलें उत्तर सर्वांच्या परिचयाचें आहे,–" अर्थस्य पुरुषोदासः–" मनुष्य हा अर्थाचा गुलाम आहे. म्हणून **श्रीवल्लभाचार्य** आज्ञा करितात.—

**असमर्पितवस्तूनां तस्माद्वर्जनमाचरेत्** ॥४॥ ( मि. र. )

" असमर्पित म्हणजे समर्पण न केलेल्या किंवा समर्पणास अयोग्य अशा वस्तूंचा उपयोग कधींहि करूं नये, त्याचा त्यागच केला पाहिजे." कारण त्या उपयोगात आणल्यास पाप किंवा दोष लागतो.

**( ३३ ) समर्पणास योग्य वस्तुः—**

**इष्टं लोके तथा स्वस्य यच्चिरं चित्तचिन्तितम् ।**
**तद्वै समर्पयेद्भक्त्या भक्तिसंबन्धि सर्वथा ॥ ६९ ॥**

–श्रीहरिरायवचनामृत

"लोकांत इष्ट म्हणजे इच्छिलेली व मनाने पुष्कळ दिवसापासून चिन्तन केलेली स्वतःची वस्तु प्रभूला भक्तीने समर्पण करावी." तसेच मनुस्मृतींतहि–

**अघं स केवलं भुंक्ते यः पचत्यात्मकारणात् ।**
**यज्ञशिष्टाशनं ह्येतत्सतामन्नं विधीयते ॥** (३–११८ )

जो आपल्याकरितांच ( अन्न ) शिजवितो तो केवळ पाप भक्षण करितो, यज्ञ करून जें शेष राहील त्यास ' अमृत ' आणि इतर सर्व जेवून जे शेष राहील ( भुक्तशेष ) त्यास ' विघस ' ( मनु. ३–२८५ ) हे नांव असून, तेंच अन्न शिष्ट लोकांस विहित होय, असे गीतेतहि म्हटलें आहे.

**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।** (गी. ४–३१)

"अमृत म्हणजे यज्ञ करून जे शेष रहातें, त्याचा उपभोग घेणारे सनातन ब्रह्माप्रत पोंचतात." अर्थात् यज्ञात शेष राहिलेल्या अमृत भागाने-प्रसादाने-सत्पुरुष पापमुक्त होतात. म्हणून प्रसादी अन्नानेच देहाचे पोषण करावें. हा मुख्य सिद्धांत आहे. श्रीमद्भागवतांतहि-" **उच्छिष्टभोजिनो दासास्तव मायां जयेमहि** "–हे भगवन् ! तुमच्या प्रसादी वस्तूंचा उपयोग करून आम्ही तुमच्या मायेला तरून जाऊ. अशा प्रसादी वस्तूंनीच त्या वस्तूंतील दोष नाहींसे होतात. व अशा वस्तुच ग्रहण करण्यास योग्य आहे. म्हणून **श्रीवल्लभाचार्य** आज्ञा करितात.–

"**तस्मादादौ सर्वकार्ये सर्वं वस्तुसमर्पणम् ॥६॥** (सि. र. )
"सर्व कार्यारंभी सर्व वस्तूंचें समर्पण करूनच त्याचा व्यवहारात उपयोग करावा." तसेंच ते पुढें आज्ञा करितात–

**सेवकानां यथा लोके व्यवहारः प्रसिध्यति ॥७॥** (सि. र.)
**तथा कार्यं समर्प्यैव सर्वेषां ब्रह्मता ततः ॥**

"ज्या प्रमाणें सेवकांचा व्यवहार मान्य गणला जातो, त्याप्रमाणें प्रभूला अर्पण करून सर्व कार्यें केलीं म्हणजे तीं प्रभूला मान्य होऊन त्यांना ब्रह्मत्व प्राप्त होतें." कारण व्यवहारांत कुशल सेवक स्वामीच्या आज्ञेनुसार सर्व कार्य करीत असतो, एवढेंच नाहीं, पण स्वामीच्या सहवासानें त्याच्या आज्ञेची वाट न पाहातां त्याचा आशय जाणून तें करीत असतो. व स्वतःच्या सुखाची तो पर्वा करीत नसतो. तद्वत् भक्त प्रभूच्या इच्छेनुसार आपली इच्छा अनुकूल करून निरहंकार वृत्तीनें व अनासक्तीनें सर्व कार्यें करितो व तीं परमेश्वरार्पणपूर्वक होत असल्यामुळें त्यांना ब्रह्मत्व प्राप्त होऊन तीं भगवद्रूप

होतात. सारांश, जो समर्णास योग्य वस्तु वापरतो व असमर्पितवस्तूंचा त्याग करितो, त्याला **श्रीवल्लभाचार्य** आशीर्वाद देतात कीं–

**सर्वं समर्पितं भक्त्या कृतार्थोऽसि सुखी भव ॥८॥** (अ.प्र.)

“ तुझें भक्तिपूर्वक सर्व समर्पण झालें आहे. आतां तूं कृतार्थ झालास. तुला सुख मिळो. ”



# रत्न ५ वें.

## अन्याश्रयत्याग.

या संप्रदायांतील दोन महादोषांपैकीं एकाचे म्हणजे असमर्पितवस्तूबद्दल आपण मागें विवेचन केलें. आतां दुसऱ्या म्हणजे अन्याश्रयाबद्दल या संप्रदायाचें काय म्हणणें आहे तें पाहूं.

अन्याश्रय ( अन्य+आश्रय ) म्हणजे परक्याचा आश्रय, व अनन्याश्रय म्हणजे फक्त एकाचाच आश्रय, अन्याश्रयत्यागाचें तत्व कसें आस्तित्वांत आलें असावें याचा विचार करितांना आपणांस वल्लभकालीन लोकस्थितीचें निरीक्षण करणें भाग आहे. या परिास्थितीचें वर्णन **श्रीवल्लभाचार्यांनीं** आपल्या ‘ कृष्णाश्रय ’ नामक ग्रंथांत उत्तम केलेलें आहे. त्याचाच सारांश आम्ही येथें उध्दृत करितों.

### ( ३४ ) वल्लभकालीन लोकस्थितिः—

**श्रीवल्लभाचार्यांचा** काल सुमारें इ. स. १५०० ते १६०० पर्यंतचा आहे. त्यासमयीं कर्मादि सर्व मार्गींचें शुद्ध स्वरुप नष्ट झालें होतें, जनता धर्माविषयीं साशंक बनली होती. देश ल्मेंच्छ यवनांनीं आक्रमण केल्यामुळें पापाचें स्थान बनला होता. साधुजनांना कष्ट सहन करावें लागत होतें. गंगादि पवित्र नद्या व इतर तीर्थस्थानें मुसलमानांनीं भ्रष्ट केल्यामुळें तेथील दैवी माहात्म्याचा लोप होत होता. विद्वान् पंडितवर्ग लोभाला बळी पडून दुराचारी लोकांचा अनुयायी बनला होता. उदात्त व धार्मिक आचरणांना केव्हांच त्यांनीं तिलांजलि दिली होती. त्यामुळें त्यांचीं अंतःकरणें पापप्रचुर

चनली होती. सर्वत्र ढोंगी लोकांचा सुळसुळाट झाला होता. कित्येक हिंदुधर्माचा त्याग करून मुसलमान बनले होते. मुसलमानाच्या राजवैभवाला हिंदु जनता भुलली होती म्हणून म्हणा, अगर आपण हिंदु असल्यामुळें हिंदुत्व कायम टिकविण्यास अत्यंत हालअपेष्टा भोगाव्या लागतात म्हणून म्हणा पाहिजे तर, परंतु जबरीनें किंवा स्वखुषीनें मुसलमान धर्म स्वीकारावा लागत असे. या कालांत परकीय विधर्मी लोकांनीं कहर उसळून दिला होता. यांच्या महा-बलाढ्य आक्रमणाला हिंदुसमाज बळी पडल्यामुळें तो आमूलाग्र खिळखिळा झाला होता. देशांत राजकीय असंतोष, धार्मिक अस्व-स्थता व कौटुंबिक दुःख वाढलें होतें. एकंदरीत तत्कालीन लोक-स्थिति फारच दुःखगर्भ व निराशाजनक होती. लोकांना कोणत्या धर्माचें अवलंबन करावें, या बाबतींत बिकट प्रश्न पडला होता. व याचा परिणाम म्हणजे सनातन हिंदूधर्माचा एकसारखा ऱ्हास होत होता. तत्कालीं अनेक पंथ व मत यांचा बुजबुजाट व गलबला झाला होता. राजा ज्या पंथाचा त्या पंथाला राजाश्रय व त्यांच्याच हातीं राज्यकारभार असल्यामुळें अन्य पंथीयांना त्याचा जुलूम सहन करावा लागे.

अशावेळी **श्रीवल्लभाचार्य** पुढें येऊन त्यांनीं अन्याश्रयत्यागाचा सिद्धांत मांडला. " वाटेल ती परिस्थिति येवो तुम्ही धर्मच्युत होऊं नका. तुम्हांस जर आश्रय पाहिजे असेल तर तो एका पूर्ण परब्रह्म परमेश्वराचाच करा. या संकटकालीं लौकिक आश्रयाला भुलूं नका. आपल्या धर्मावर श्रद्धा ठेवा. " असा संदेश त्यांनीं सर्वत्र पाठविला, व आपल्या अमृतवाणीनें जनतेला मुग्ध करून त्यांनीं स्वधर्माचें रक्षण केलें. गुजरात, काठेवाड, कच्छ, राजपुताना व मेवाड इत्यादि प्रांतांतून **श्रीवल्लभाचार्य**, बंगाल, बिहार व ओरिसामध्यें श्रीकृष्ण-चैतन्य व गौरांगप्रभु व महाराष्ट्रांत एकनाथ वगैरे साधुसंत

दिङ्मूढ झालेल्या जनतेला योग्य दिशा लावण्यास प्रकट व्हावें, हें हिंदुस्तानचे महद्भाग्य होय. दुष्टांचा संहार, सज्जनाचें रक्षण व धर्मसंस्थापना हीं तीन कार्यें करण्यासाठीं प्रभु या पृथ्वीवर अवतार धारण करितात, याची सत्यता पटते. भागवतधर्माची जी लाट त्यावेळी उत्पन्न झाली, तिचे फल म्हणजे महाराष्ट्रात शिव-प्रभूचें राज्यसंस्थापन व उत्तरेंत रजपूत घराण्यात स्वधर्माविषयी अतुल अभिमान ! त्याच्यांत जी वीरश्री, श्रद्धा व भक्ति उत्पन्न झाली ती आजतागायत कायम आहे. याचे सर्व श्रेय आचार्यवर्यांना व वरील साधुसंतांनांच दिलें पाहिजे. कित्येकांचा असा प्रश्न आहे कीं **श्री वल्लभाचार्यां**नी महाराष्ट्रात आपल्या सिद्धांताचा प्रचार कां केला नाहीं ? याला एवढेच उत्तर देता येईल कीं, त्यांचेच समकालीन साधुसंत त्याच भागवतधर्माचा महाराष्ट्रात उपदेश करीत होते. तसेंच महाराष्ट्रीय साधुसंतांना मेवाड व गुजरातकडे या वरील कारणास्तव धर्मप्रचारास जाण्याची जरूर पडली नाहीं. खरोखर या आचार्य-वर्यांचे व साधुसंतांचे आपण उपकार मानावयास पाहिजेत. " जर भरतखंडांत व महाराष्ट्रांत त्याकाली भक्तिमार्ग नसता तर अफगाणि-स्थान, इराण वगैरे देशांतल्याप्रमाणे ह्या देशांतील सर्व प्रजा एक-वर्णी मुसलमान झाली असती. आणि आर्यसंस्कृति, आर्यसारस्वत ... आर्यशील ह्या जगातून समूळ उच्छिन्न झालें असतें. " असें राजवाड्यांनीं केलले वर्णन अगदीं समर्पक आहे.

## ( ३५ ) विभूतिपूजेचें प्रस्थः—

अन्याश्रयत्यागाचा सिद्धांत मांडण्यास जी अनेक कारणें दिसून आलीं त्यांपैकीं यावनी सत्तेचा जुलूम व बाटवाबाटवी हें तर आहेच; परंतु यापेक्षांहि महत्वाचें म्हणजे त्याकाळीं विभूतिपूजेचें प्रस्थ माजलें होतें. क्षुद्र देवतांची उपासना फार वाढली होती. **श्रीवल्ल-**

आचार्यांचे समकालीन **एकनाथ** महाराज हिंदूंची स्थिति वर्णन करितांना म्हणतात—' दावलमलकाची पूजिती गदा । वर्षांतून फकीर होती एकदां । मग डोला होतां थंडा । खाती मलिदा हिंदु तुर्कांचें खरकटें ' ( गाथा पंचक ३८९२ ) ताबूताच्या सणांत पीराची पूजा करणें, नवस करणें, त्याला खिचडी देणें, असे प्रकार हल्लीं सुद्धां कित्येक ठिकाणीं हिंदूंत दिसून येतात. ह्यावरून हिंदू-वर मुसलमानी संस्कृतीचा पगडा त्यावेळीं किती असेल याची कल्पना होईल. तसेंच ते एके ठिकाणीं म्हणतात—" कलिमाजीं दैवतें उघड दिसती फार । नारळ आणि शेंदूर यांचा भडिमार ॥ " ( गा. पं. २५८४ ) म्हणून मेसाबाईपुढें मेंढरें, बोकड मारण्या-ऐवजीं विठाबाईला भजा असा उपदेश एकनाथांनी केला आहे. ( गा. पं. ३५८७ ) अज्ञ जनता या विभूतिपूजेच्या जाळ्यांत कशी सांपडली याचें दिग्दर्शन वरील ओवींतून स्पष्ट होतें. हिंदुधर्मांत तर अनेक देवता आहेत, कोणत्या देवतेची पूजा केली असतां आपली मनोकामना पूर्ण करील व दुःख नाहींसें करील ? या देवतांच्या उपा-सनेनें कोणतें फळ मिळेल याचा जर शास्त्रदृष्ट्या विचार केला तर त्याचें फल अनित्य होय. मनुष्य ऐहिकसुखासाठीं अनेक देवतांची उपासना करितो; पण त्या सर्व क्षणिक व नाशवंत फल देणाऱ्या आहेत. खरें नितांत व शाश्वत सुख परब्रह्म परमेश्वराच्या सेवेंतच आहे, हें तो विसरतो. खऱ्या भक्ताला त्याच्या अनन्य भक्तीखेरीज कस-लीच अपेक्षा नसते. " कित्येकांची अशी समजूत आहे कीं, परमे-श्वराची भक्ति मोक्षासाठीं आहे; पण ज्याला व्यावहारिक किंवा स्वार्थाच्या गोष्टीची अपेक्षा आहे त्यानें निरनिराळ्या देवतांचीच आराधना केली पाहिजे; व या स्वार्थबुद्धीनें ते या देवतांच्या नादीं लागत असतात असा गीतेंतहि उल्लेख आलेला आहे (गी. ७-२०).

परंतु गीताच पुढें असें सांगत्यें कीं, या देवता त्यांच्या आराधनेची फळें स्वतः आपण होऊनच देतात ही समजूत तात्त्विकदृष्ट्या खरी नव्हे ( गी. ७-२१ ). कोणतीहि वासना मनांत धरून तुम्ही कोणत्याहि देवतेची आराधना करा, मद्दर आराधनेचें फल देण्याचें काम सर्वव्यापी परमेश्वराचें आहे, देवतांचे नव्हे, असा अध्यात्मशास्त्राचा कायम सिद्धांत आहे. ( वेसू. ३.२.३८–४१ ), व तोच गीतेसहि मान्य आहे ( गी. ७-२२ ). परंतु फल देणारा परमेश्वर जरी याप्रमाणें एकच असला तरी ज्याच्या त्याच्या बऱ्याबाईट भावनेप्रमाणें तो ज्याला त्याला निरनिराळें फल देत असल्यामुळें ( वे. सू. २,१.३४-३७ ) निरनिराळ्या देवतांच्या किंवा प्रतीकांच्या उपासनेचीं फलें भिन्नभिन्न आहेत असें आपल्या नजरेस येतें; आणि हाच अभिप्राय मनांत आणून—

**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ।**

" मनुष्य श्रद्धामय आहे, प्रतीक कोणतेंहि असो, ज्याची जशी श्रद्धा तसा तो होतो ( गी. १७·३; मैत्र्यु. ४·६ ); किंवा—

**यांति देवव्रता देवान् पितॄन् यांति पितृव्रताः**

**भूतानि यांति भूतेज्या यांति मद्याजिनोऽपि माम् ॥**

" देवांची भक्ति करणारे देवलोकांस, पितरांची भक्ति करणारे पितृलोकांस, भूतांची भक्ति करणारे भूतांस, आणि माझी भक्ति करणारे मला येऊन पोंचतात " ( गी. ९.२५ ) अगर--

**ये यथां मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ।**

" जे मला जसे भजतात त्याप्रमाणें मी त्यांना भजतों " ( गी. ४-११ )–असें अन्यत्रहि भगवंतांनीं म्हटलें आहे" (गी. र. ४२०). तसेंच गीतेच्या दहाव्या अध्यायांत " भगवंताच्या विभूति, अर्जुन

विचारितो याचें कारण निरनिराळ्या विभूतींचें देवता म्हणून ध्यान करण्याकरितां नव्हे, तर सदर विभूतींत सर्वव्यापी परमेश्वराचीच भावना ठेवण्याकरिता होय, असें जे सतराव्या श्लोकांत म्हटलें आहे तें लक्षांत ठेवले पाहिजे. कारण, एकच परमेश्वर सर्व ठिकाणीं आहे हें ओळखणे आणि परमेश्वराच्या निरनिराळ्या विभूति, निरनिराळ्या देवता आहेत असे मानणे, यात भक्तिमार्गदृष्ट्या महदंतर आहे हे भगवंतांनी पूर्वीच ( गी. ७.२०-२६; ९.-२२-२८) सांगितले आहे" ( गी. र. ७५६ ).

कित्येक वेळां "शास्त्रावर श्रद्धा असूनहि मनुष्य अज्ञानाने चुकतो. उदाहरणार्थ, सर्वव्यापी परमेश्वराचे भजन पूजन करावे हा शास्त्रविधि सोडून देवतांच्याच नादीं लागतो ( गी. ९.-२३ ). तरी अशा पुरुषाची निष्ठा म्हणजे अवस्था अगर स्थिति कोणती असा अर्जुनाचा प्रश्न आहे" ( गी. र. ८१९ ). सात्त्विक, राजस की, तामस ? तेव्हा भगवान् म्हणतात––

**यजन्ते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।**
**प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः॥** (गी.१७-४)

"सात्त्विक म्हणजे सत्त्वगुणप्रधान स्वभावाचे जे पुरुष ते देव चें यजन करितात; राजस यक्षराक्षसांचे, आणि याशिवाय बाकीचे तामस प्रेते व भूतगण यांचें यजन करितात."

वरील प्रमाणेंच बृहदारण्यकोपनिषदांत विचार दिसून येतात––

**अन्यां देवतामुपास्ते अन्योऽसौऽन्योहमस्मीति न स वेद यथा पशुरेवं स देवानाम् ।** (१–४–१०)

"जो देवतांची आपल्यापेक्षां वेगळ्या रीतीनें उपासना करितो म्हणजे भेदभावानें भिन्न देवतांच्या नादीं लागतो तो 'देवांचा पशु'

होय, म्हणजे गवादि पशूंपासून मनुष्यास जसा फायदा होतो तसा या अज्ञानी भक्तापासून देवतांचा मात्र फायदा होतो, त्याच्या भक्तास मोक्ष मिळत नाहीं." तेव्हां विभूतिपूजा किंवा अन्यदेवता-पूजन याबद्दल गीतेचे व उपनिषदाचें म्हणणे काय आहे तें आपण पाहिलें. आतां भागवतकार काय म्हणतात ते पाहूं. ते या बाबतीत वृक्ष आणि शाखा यांचा दृष्टांत देतात. तो असा—

**यथा हि स्कंधशाखानां तरोर्मूलावसेचनम् ।**
**एवमाराधनं विष्णोःसर्वेषामात्मनश्च हि ॥**

झाडाच्या मूलावर जलसिंचन केलें म्हणजे तें मूलद्वारा सर्व शाखा व पान एवढेंच काय पण पानांतील अंतरेषेलासुद्धां पोंचतें. अशारीतीनें तें झाड परिपूर्ण पोसलें जाऊन टवटवीत दिसतें. या विरुद्ध त्याच्या शाखा किंवा डहाळीवरच फक्त जलसिंचन केलें तर तें टवटवीत दिसत तर नाहीच, पण पुढें उमलतहि नाहीं. म्हणून त्याच्या मूलावरच पाणी घालायला हवे. तद्वत या सर्व देवता परमात्मरूपी वृक्षाच्या शाखारूपी विभूति होत. यांचें मूल परमात्मा आहे. यासाठीं या भ्रांतिमूलक अनेक देवतांवर भक्तिसि-चन न करितां सरलमार्ग म्हणजे जो सर्वांचा नियंता आदिमूल पूर्ण परब्रह्म पुरुषोत्तम आहे त्याचीच अनन्यभावें भक्ति करावी. त्याचाच आश्रय घ्यावा. कारण त्याच्याच भक्तीनें सर्व देवता शांत होतात. म्हणून अनेक देवतांची उपासना न करितां फक्त एका पुरुषोत्तमाचीच भक्ति करावी. भगवान् म्हणतात—"**सर्वं मद्भक्तियोगेन मद्भक्तो लभतेऽञ्जसा**"—माझा भक्त माझ्या भक्तीनेंच सर्व इच्छित मिळवितो. माझा आश्रय कल्पद्रुमापेक्षांहि श्रेयस्कर आहे. माझ्याच आश्रयाखालीं तुम्हीं सर्व या, असा भगवंताचा उपदेश आहे.

**( ३६ ) एक व्यावहारिक दृष्टांतः—**

पतिव्रता स्त्री फक्त एकाच पतीची सेवा करते. तद्वत् पूर्ण पुरुषोत्तम आपले स्वामी असतांना आपण दुसऱ्याचा आश्रय का म्हणून करावा ? याचा अर्थ असा नव्हे कीं, त्या पतिपरायण स्त्रीनें तिच्या सासवा, नणंदा, व दीर यांना मान देऊं नये. त्याच्या योग्यतेनुसार ती सर्वांना मान तर देतच असते; परंतु अनन्यभावें जर कोणाला ती शरण जात असेल तर फक्त आपल्या पतिदेवालाच. पतिदेव हाच तिचा आश्रय. या विरुद्ध वागणारी स्त्री व्यभिचारी समजली जाते. तेव्हां आदिमूल परमात्म्याची भक्ति सोडून जो केवळ आपल्या देह व इंद्रियाच्या सुखासाठी किंवा वैभवासाठी अनेक देवतांची उपासना करितो, त्याचें हे करणें एकरित्या व्यभिचारासारखें नाही काय ?

म्हणून श्रीवल्लभाचार्यांनीं सर्वकालीं व सर्व स्थळीं फक्त एकाच पूर्ण परब्रह्म सर्वव्यापी पुरुषोत्तमाचा आश्रय करण्याचा उपदेश केलेला आहे. व अन्याश्रयाचा त्याग करण्याम आज्ञा केलेली आहे. त्याचीच प्रेमभावयुक्त सेवा करणें हेंच श्रेयस्कर. पुष्टिमार्गांत सेव्य एकच पूर्ण पुरुषोत्तम भगवान् श्रीकृष्ण. गीतेत प्रभू म्हणतात;— "**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते**—" मी सर्व श्रेष्ठ आहे. सर्व विभूति मीच निर्माण केल्या. मी सर्वांचें उत्पत्तिस्थान, व माझ्यापासून सर्व वस्तूंची प्रवृत्ति होते ( **गी.** १०–८ ). अशी व्यापकदृष्टि प्रभु ठेवण्यास सांगतात, व हीच व्यापकदृष्टि या संप्रदायांत स्वीकारली आहे. याच कारणास्तव 'अन्य देवतांची उपासना न करितां फक्त श्रीकृष्णाला भजा,' असा उपदेश केला आहे. याचा अर्थ असे नव्हें की, इतर देवतांचा तिरस्कार करावा किंवा त्यांना धिक्कारावें. कारण अन्य देवतांच्या निंदेला या पुष्टिमार्गासारख्या विश्वधर्मांत स्थान नाही.

## ( ३७ ) अन्याश्रयत्यागाचा विपरीत अर्थः—

या अन्याश्रयत्यागाचा फारच संकोचित व सांप्रदायिक अर्थ कित्येक कर्मठ वैष्णव भक्तांनीं केलेला आढळून येतो. ते शिवब्रह्मादि देवांचें नांवसुद्धां उच्चारीत नाहींत. यामुळें त्याचा दुष्परिणाम इतर संस्कृतीवर फारच झाला. जो पुष्टिमार्ग विश्वादर्श विश्वपोषक धर्ममार्ग म्हटला जावा, तो एक अशा हीन स्थितीस आला आहे कीं, त्याची कीव करावी तेवढी थोडीच. आचार्यांनीं संस्थापन केलेला हा मार्ग फक्त त्यांच्याचसाठीं आहे. श्रीवल्लभप्रणीत बोधवचनें त्यांच्याच कल्याणासाठीं आहे असें त्यांना वाटतें. वास्तविक या कर्मठ लोकांना खरोखर धर्माचें सिद्धांत काय आहेत हें बरोबर कळलेलें दिसत नाहीं, ते एकच धोपट मार्ग समजतात. फक्त अन्याश्रयाचा त्याग; पण या त्यागांत अतिशयोक्ति किंवा अन्याचा तिरस्कार नाही, हें ते विसरतात. अन्याश्रयत्यागाचा अर्थ आचार्यांनी कसा केला, त्या शब्दाचा उपयोग कोणत्या कारणासाठीं केला, त्यांची कशी व्यापकदृष्टि होती याचा योग्य मीमांसा व्हावयास पाहिजे. तत्कालीन लोकस्थितीचें निरीक्षण केल्यास कळून येईल की, जनतेला सन्मार्गाला लावण्यास अन्याश्रयत्यागाची विशेष जरूर होती. अनेक लुंगे सुंगे लोक म्हसोबा, खंडोबा, भूत—पिशाच्च, मरीमाया वगैरे मानवप्राण्यांनीं आपल्या स्वार्थासाठीं निर्माण केलेल्या हीन देवतांच्या नादीं लावीत होते. आदिमूल परब्रह्माची उपासना सोडून जनता कुमार्गास लागली होती. परकीयांच्या त्रासामुळें ती हीन व दुर्बल बनली होती. अशावेळीं आचार्यांनीं तिच्या सुषुप्त हृदयांत नव चैतन्याचा झरा उत्पन्न करून त्यांना प्रभूच्या निस्सीम भक्तिरसाचें अमृतपान पाजलें. त्याच्यांत उत्साह व उत्तेजन निर्माण करून आपलें कर्तव्य काय असावें, याची योग्य शिकवण दिली. व ह्या हीन दर्जाच्या विभूतीच्या नादीं न लागतां श्रुतिप्रतिपादित एकाच उच्चतम व शुद्ध परम

श्रेष्ठ प्रभूची सेवा करण्यास जनतेला बनविलें. त्यालाच तुम्ही शरण जा; त्याचाच तुम्हीं आश्रय करा; तोच तुमचा उद्धार करील;परक्यांचा आश्रय करूं नका; कारण त्यानें चिरकाल शांति लाभणार नाहीं. आपल्या जीवनाची कल्याणप्रद अवस्था प्राप्त करून घ्यावयाची असल्यास सर्व समर्थ प्रभूचाच आश्रय घ्या. त्यालाच भजा. त्यांतच चित्त रमवा. असा श्रीवल्लभाचार्यांनी ठिकठिकाणी आपल्या ग्रंथांतून उपदेश केलेला आहे. याचा अर्थ असा नव्हे की, हिंदुधर्मानें मानलेले शिव ब्रह्मादि देव तुच्छ आहेत. आचार्यांनी आपल्या प्रवासांत अनेक देवतांना मान दिला आहे. व त्यांना नमन केले आहे. परतु त्यांची अढळ श्रद्धा फक्त एका श्रीकृष्णावरच होती. अन्य देवतांची निंदा करा, असें कोणत्याहि ग्रंथांतून त्यांनीं प्रतिपादन केलेले नाही. षोडश ग्रंथांतून असे किती तरी उल्लेख देता येतील की, त्यांत त्यांनीं ‘ शिव ’ शब्द वापरला आहे, एवढेंच नव्हें तर शिवाला मान दिला आहे. असे थोर व उदात्त भक्त अन्य देवतांची निंदा करतील हें संभवतें तरी कसें ? ते म्हणतात– –

**अतः शिवश्च विष्णुश्च जगतो हितकारकौ ॥ ११ ॥**
**भोगः शिवेन मोक्षस्तु विष्णुनेति विनिश्चयः॥१४॥**(बालबोध)

“ म्हणून शिव व विष्णु हे जगताचे कल्याणकर्ते देव आहेत. शिव हा भोगदाता तर विष्णु मोक्षदाता आहे. ” तसेंच इतरत्रहि शिवाला मान दिल्याचे उल्लेख देतां येतील. सारांश, अन्याश्रयत्यागाचा व्यापक अर्थ घ्यावयास पाहिजे. यांत अन्य देवतांचा अपमान होत नसून परब्रह्म परमात्म्याला अनन्यभावें शरण गेले किंवा त्याचा आश्रय घेतला म्हणजे अन्य देवतासुद्धां आपोआप संतुष्ट होतात. वास्तविक त्याची निरनिराळी पूजाअर्चा करावयास नको.

**( ३८ ) कृष्णाश्रय–**

वरील विवेचनावरून आपणास कळून येईल कीं, **श्रीवल्लभाचार्य** हे परब्रह्म श्रीकृष्णाचे अनन्यभक्त होते, व त्यांनीं आपल्या 'कृष्णाश्रय' नामक ग्रंथांत वाटेल त्या बिकट परिस्थितींतहि–"**कृष्ण एव गतिर्मम**"–श्रीकृष्ण परमात्मा हाच माझी गति होवो, तोच माझें आश्रयस्थान होवो, तोच माझा शरण्य होवो; अशी सर्वत्र प्रार्थना केलेली आढळून येते. तसेच:—

**प्राकृताः सकला देवा गणितानन्दकं बृहत् ।**
**पूर्णानंदो हरिस्तस्मात् कृष्ण एव गतिर्मम॥८॥(कृष्णाश्रय)**

सर्व देव प्राकृत आहेत, व बृहत् ( अक्षरब्रह्म ) गणितानंद आहे. इतर सर्व देव त्याच्या प्रकृतीपासून उत्पन्न झालेले आहेत. तैत्तिरीय उपनिषदांत प्रत्येक देवताच्या आनंदाची गणना केलेली आहे. त्यात ब्रह्मादिकांच्या शंभरपट आनंद म्हणजे अक्षरब्रह्माचा एक आनंद होतो, अशी गणना केलेली आहे. परंतु पूर्णानंद श्री कृष्णाच्या आनंदाची गणना करता येणे शक्य नाहीं, म्हणून तोच माझी गति होवो असे म्हटले आहे. देवादिकाच्या उपासनेनें त्या देवादिकाचे सायुज्य मिळेल, परतु भगवान स्वतः म्हणतात—

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।**
**मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ ( गी.८–१६)**

"हे अर्जुना ! ब्रह्मलोकासुद्धा ( स्वर्गादि ) जे लोक आहेत तेथून ( केव्हां ना केव्हां तरी या लोकीं ) पुनरावर्तन म्हणजे परत फिरणें ( भाग ) आहे. पण हे कौंतेया ! मला येऊन मिळाले म्हणजे पुनर्जन्म नाहीं." यज्ञ देवताराधन, वेदाध्ययन वगैरे कर्मांनी इंद्रलोक, वरुणलोक, सूर्यलोक किंबहुना ब्रह्मलोक जरी प्राप्त झाला तरी पुण्यांश सरल्यावर तेथून पुनः मागे फिरून इहलोकी जन्म

घ्यावा लागतो ( बृ. ४.४.६ ), किंवा निदानपक्षीं ब्रह्मलोकाचा नाश झाल्यावर तरी पुनर्जन्मचक्रांत पडणें जरूर पडतें. म्हणून या सर्व गति हलक्या प्रतीच्या होत, आणि परमेश्वराच्या ज्ञानानेंच पुनर्जन्म नष्ट होत असल्यामुळें ती गति सर्वांत श्रेष्ठ असा १६ व्या श्लोकाचा भावार्थ आहे " ( गी. र. ७३२ ). म्हणून पूर्णानंद श्रीकृष्णाचाच आश्रय करावा हें उत्तम होय. कारण अन्यांच्या म्हणजे परक्यांच्या आश्रयाचा आनंद कमी प्रतीचा असून तो गणितानंद आहे. तेव्हां अगणित असा ज्याचा ब्रह्मानंद आहे, तोच "–**कृष्ण एव गतिर्मम**–" श्रीकृष्ण माझी गति होवो. अशी प्रार्थना आचार्यांनीं केलेली आहे. ती किती उदात्त व उच्च कोटीची आहे हें दिसून येईल. ते आज्ञा करितात—

**अतः सर्वात्मना शश्वद्गोकुलेश्वरपादयोः ।**
**स्मरणं भजनं चापि न त्याज्यमिति मे मतिः ॥ ४ ॥**
( चतुःश्लोकी )

" म्हणून श्रीगोकुलेश्वरपादाचें म्हणजे श्रीकृष्णाच्या चरणारविंदाचें नित्य सर्वात्मभावपूर्वक स्मरण व भजन करावें. या दोघांचा कदापि त्याग करूं नये. अशी माझी मान्यता आहे. "

**( ३९ ) प्रभूवर अढळ श्रद्धाः—**

**अविश्वासो न कर्तव्यः सर्वथा बाधकस्तु सः ।**
**ब्रह्मास्त्रचातकौ भाव्यौ प्राप्तं सेवेत निर्ममः ॥१५॥**(वि.धै.आ.)

" प्रभूचे ठायीं अविश्वास दाखवूं नये. कारण तो सर्वप्रकारें बाधक आहे. ब्रह्मास्त्र व चातक यांच्याप्रमाणें भावना ठेवावी, व जें प्राप्त होईल तें ममत्वबुद्धि सोडून भोगावें."

इंद्रजितानें हनुमंताला ब्रह्मास्त्रमंत्रानें मंतरलेल्या सूतानें बांधून रावणासमोर आणलें; परंतु रावणाचा त्या ब्रह्मास्त्रावर विश्वास बसेना.

म्हणून त्यानें त्याला मजबूत साखळदंडानें बांधण्याची आज्ञा केली. व ब्रह्मास्त्रानें मंतरलेलें सूत काढून टाकिलें. त्यामुळें रावणाचा सर्वस्वी नाश झाला. साखळदंडानें जरी हनूमान् जखडला गेला होता तरी त्याला तो तोडणें अशक्य नव्हतें. ताबडतोब त्यानें तो ताडताड तोडला व त्यांतून मुक्त होऊन लंकेला आग लावली. म्हणून प्रभूवर पूर्ण अढळ श्रद्धा ठेवावी. रावणासारखा अविश्वास दाखवूं नये. प्रभूचा दृढपूर्वक आश्रय करावा. ज्याप्रमाणें चातकपक्षी सर्वस्वी मेघावर अवलंबून असतो. मेघ जड होतांच त्याची तहान शमतें, व त्याची इच्छा पूर्ण होतें. त्याचप्रमाणे आपला प्रभूवर पूर्ण विश्वास असल्यास आपलीसुद्धां इच्छा पूर्ण होईल यांत काय संशय ? कारण, "—**प्रभुः सर्वसमर्थो हि ततो निश्चितता व्रजेत्**—" तो सर्वसमर्थ आहे. त्यावर फक्त सुदृढ विश्वास ठेवा, व निश्चित असा. (चतुःश्लोकी २) कसलीहि काळजी करूं नका. असें **श्रीवल्लभाचार्य** आश्वासन देतात.

## (४०) स्वधर्मे निधनं श्रेयः—

श्रीहरिरायजी आपल्या एका ग्रंथांत म्हणतात:—"**निवृत्तिराग्रहेणैव विधर्मादिति निश्चयः**"—आपल्या धर्माहून जो परका धर्म त्यापासून आग्रहपूर्वक निवृत्त राहावे. अर्थात् त्यापासून दूर असावें. असा निश्चय पाहिजे. परक्या धर्माचा कधींहि आश्रय घेऊं नये व स्वधर्मच्युत होऊं नये. आपल्या धर्मावर निष्ठा ठेवून स्वधर्माचरण करावें. ह्यांतच मनुष्याचें कल्याण आहे. **श्रीविठ्ठलनाथजींनासुद्धां** स्वधर्माबद्दल केवढा अभिमान होता हें त्यांच्या खालील वचनावरून कळून येईल.

" **अन्यसंबंधगन्धोऽपि कंधरामेव बाधते ।** "

अन्य संबंधाचा केवळ गंधहि माझ्या डोक्यांत घाव घातल्यासारखा मला बाधक होतो. तन, मन, धन व कर्मानें त्यांनीं एका प्रभूचाच

आश्रय स्वीकारला. पुष्टिमार्गाच्या सिद्धांताप्रमाणें प्रभूच्या संबंधा-शिवाय अन्य संबंध याना हानिकारक वाटत असें. प्रभूवरील सुदृढ, सर्वाधिक, निर्हेतुक प्रेमच खरें तत्व होय. म्हणून ते म्हणतात कीं,— " शिरच्छेद होण्याचा प्रसंग आला तरी खरा भक्त अन्य संबंधाचा म्हणजे परक्या धर्माचा गंध सुद्धा लागूं देत नाही. मग परका धर्म स्वीकारणे तर दूरच राहिले ! " ह्याचें उत्तम उदाहरण संभाजी महाराज होय. भगवान श्रीकृष्ण म्हणतात—

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥** ( गी. ३-३५ ).

" परक्याचा धर्म सुखाने आचरिता आला तरी त्यापेक्षा आपला धर्म विगुण म्हणजे सदोष असला तरी तोच अधिक श्रेयस्कर आहे. स्वधर्माप्रमाणे ( वागत असतां ) मरण आले तरी त्यांत कल्याण आहे; ( परंतु ) परक्याचा धर्म भयंकर होय ! "

सारांश, अन्याश्रयत्यागाच्या सिद्धांतात स्वधर्माप्रमाणे आचरण करून एकाच परब्रह्म पुरुषोत्तमाची अनन्य भक्तिच स्वीकारली आहे. व हीच शेवटी श्रेयस्कर ठरते. असा हा अमोल सिद्धांत वैष्णवांना लाधला असताना त्याला विसरून त्यांनी आपले सर्व लक्ष म्हसोबा, खंडोबासारख्या लक्षावधि क्षुद्र देवदेवता वगैरे हीन गोष्टींमध्ये घातले तेव्हांपासून त्यांची अधोगति झाली. आणि आतां जर त्यांना ही अधोगति थांबवावयाची असेल तर त्यांनी अन्याश्रयाचा त्याग करून एकाच परब्रह्म पुरुषोत्तम जो श्रीकृष्ण त्याचीच भक्ति करून वेदांतावर अधिष्ठित असलेल्या आपल्या धर्माप्रमाणें आचरण ठेवावे. हाच श्रीवल्लभाचार्यांनीं आपल्या ग्रंथांतन ठिकठिकाणी उपदेश केला आहे. त्यांच्या ह्या अन्याश्रयत्यागाच्या सिद्धांताप्रमाणें वैष्णवांनीं जर आपलें आचरण ठेविले तर हा पुष्टिमार्ग किंवा अनुग्रहमार्ग पुनः आपल्या प्रखर तेजाने चमकूं लागून वैष्णवाना पराक्रमी, निश्चयी, विजयी व उदात्त बनवील यांत संशय नाहीं.

---

# रत्न ६ वें

## सेवाधर्म.

आत्मनिवेदनानंतर पुष्टिमार्गीय वैष्णवाला प्रभूची सेवा करण्याचा अधिकार प्राप्त होतो. व त्याच्या हृदयांत प्रभूच्या अनुग्रहानें प्रेम-भक्तीचें बीज रोविलें जातें. मात्र ह्या बीजाचें पोषण त्यानें केलें पाहिजे. व ह्या पोषणाचें साधन म्हणजे प्रभूची एकाग्र चित्तानें केलेली सेवा होय. तेव्हां सेवा म्हणजे काय, ती कां करावी, ती कोणत्या भावनेनें करावी, ती केल्यापासून काय फल मिळतें; इत्यादि विषयांचे विवेचन करण्याचें येथें योजिलें आहे.

### ( ४१ ) सेवेचें लक्षण:—

सेवेचा पर्याय शब्द ' भक्ति ' किंवा ' परिचर्या ' हा होय. भक्ति शब्दांत ' भज् ' धातु आहे. त्याचा अर्थ भजन करणें असा होतो. "–**सा ( भक्तिः ) परानुरक्तिरीश्वरे**–" ईश्वराचें ठिकाणीं पर म्हणजे निरतिशय जें प्रेम त्यास भक्ति म्हणतात, असें भक्तीचें लक्षण शांडिल्यसूत्रांत दिलें आहे ( शां. सू. २ ). पर म्हणजे केवळ निरतिशयच नव्हे तर निर्हेतुक म्हणज अमक्यातमक्यासाठीं म्हणून प्रेम न ठेवतां तें निष्काम व निरंतरचें असलें पाहिजे— " **अहेतुक्यव्यवहिता या भक्तिः पुरुषोत्तमे** " ( भाग ३. २९. १२. )–असें भागवतपुराणांत सांगितलें आहे. कारण "हे परमेश्वरा ! मला अमुक दे " अशा प्रकारें भक्ति जेव्हां सहेतुक असल्ये, तेव्हां काम्य वैदिक यज्ञयागादि कर्मांप्रमाणें तिलाहि कांहीं अंशीं तरी व्यापाराचें स्वरूप येतें. भक्ति याप्रमाणें व्यापारी म्हणजे राजस झाली तर पुढें त्यामुळें पुरी चित्तशुद्धि होत नाहीं; आणि चित्त-

शुद्धि पुरी नाहीं ह्मणजे आध्यात्मिक उन्नतीस अथवा मोक्षप्राप्तीसहि त्या मानानें हिसका बसल्याखेरीज रहात नाहीं. " (गी. र. ४०९) आथर्वणोपनिषदांत भक्तीची व्याख्या करतांना उपनिषद्कार म्हणतात–" **भक्तिरस्य भजनं तदिहामुत्रोपाधिनैराश्येनैवामुष्यात्मनः कल्पनमेतदेव नैष्कर्म्यमिति**"–भक्ति म्हणजे श्रीपुरुषोत्तमाचें भजन, व भजन म्हणजे हा लोक व परलोक यांच्या उपाधीचा त्याग करून पुरुषोत्तमाचे ठिकाणीं आत्म्याचा विनियोग करणें अर्थात् भगवंतावर मन ठेविणें याचें नांव भक्ति व तेंच नैष्कर्म्य होय. या संसारातील उपाधीचा त्याग करून परमेश्वर स्वरूपाचें प्रेमानें आकलन करून मन तदाकार बनविणें हीच भक्ति होय. तसेंच नारदपंचरात्रांतहि भक्तीचें लक्षण सांगितलें आहे तें असें:—

**" माहात्म्यज्ञानपूर्वस्तु सुदृढः सर्वतोऽधिकः ।**
**स्नेहो भक्तिरिति प्रोक्तस्तया मुक्तिर्न चान्यथा ॥**

प्रभूचे ठिकाणी माहात्म्यज्ञानपूर्वक सुदृढ व निरतिशय स्नेह ठेवणें यालाच भक्ति म्हणतात. व ह्या भक्तीनेंच संसारनिवृत्ति होऊन परमानंदप्राप्तिरूप मोक्ष मिळतो. इतरांनीं तो मिळत नाहीं. वरील सर्वांचा नीट आशय लक्षांत घेऊन श्रीवल्लभाचार्यांनीं सेवेची व्याख्या अगदीं थोड्या शब्दांत समर्पक केली आहे. "–" **चेतस्तत्प्रवणं सेवा** " चित्त भगवत्परायण ठेवणें, श्रीकृष्णाचे ठिकाणीं चित्त एकाग्र करणें याचें नांव सेवा. तेव्हां भगवंतांत चित्त ठेवणें किंवा चित्तप्रवण होणें हेंच भक्तीचें किंवा सेवेचें लक्षण होय.

### ( ४२ ) श्रीकृष्ण सेव्य दैवत होय :—

या संप्रदायांत तर कोणत्याहि देवदेवतांची सेवा किंवा भक्ति केली जात नाहीं. परंतु उपनिषदांतून जे श्रेष्ठ ब्रह्मस्वरूप प्रतिपादन

**केलें** आहे त्याचीच सेवा करण्याची आज्ञा आहे. परंतु हें स्वरूप **इंद्रियातीत, अव्यक्त, अनंत,** निर्गुण आणि एकमेवद्वितीयम् आहे. **व अशा अव्यक्त व** नेत्रादि इंद्रियास अगोचर स्वरूपावर प्रेम ठेवणें साधारण मनुष्यास अत्यंत कठीण किंबहुना दुःसाध्य आहे. म्हणून शास्त्रकारांनीं परमेश्वराच्या आराधनेसाठीं सगुण व व्यक्त स्वरूपच स्वीकारलेलें आहे. व हें स्वरूप म्हणजे श्रीकृष्ण होय. ब्रह्मसूत्राच्या आनंदमयाधिकरणांत–" **आदिमूर्तिः कृष्ण एव सेव्यः** "– आदिमूर्ति श्रीकृष्णाचीच सेवा करावी. गीतेंत भगवान स्वतः म्हणतात कीं " मीच ब्रह्माचें व मोक्षाचें मूळ ( गी. १४–२७ ) किंवा ' पुरुषोत्तम आहे ' ( गी. १५–१८ ). व भागवतांतसुद्धां भागवतकारांनीं कृष्णालाच श्रेष्ठ दैवत मानले आहे,—" **कृष्णो वै परमं दैवतम्** "—श्रीकृष्णच सेव्य, भजनीय व पुरुषोत्तमस्वरूप आहे. तसेंच–" **एते चांशकलाः पुंसः कृष्णस्तु भगवान् स्वयम्** " –हे सर्व अवतार ह्या पुरुषाचे अंश व कलाभूत आहे. आणि श्रीकृष्ण तर स्वतः भगवान्च आहेत. याच कारणास्तव **श्रीवल्लभाचार्य** आज्ञा करितात की–" **लौकिक प्रभुवत् कृष्णो न द्रष्टव्यः कदाचन्** "– लौकिक राजाप्रमाणें भगवान् श्रीकृष्णाला कधींहि मानूं नये. ( अ. प्र. ७ ) तो तर–" **परं ब्रह्म तु कृष्णो हि** "–परब्रह्म आहे. ( सि. मु. ३ ). ते तत्वार्थदीप निबंधांत म्हणतात,–'**एको देवो देवकीपुत्र एव । कर्माप्येकं तस्य देवस्य सेवा** '–फक्त एकच देव व तोहि माता देवकीचा पुत्र. व कर्म तरी त्या देवाचीच सेवा होय ( त. दी. नि.४ ). म्हणून ते ' चतुःश्लोकी ' ग्रंथाच्या प्रारंभी आज्ञा करितात—

" **सर्वदा सर्वभावेन भजनीयो व्रजाधिपः ।**
**स्वस्यायमेव धर्मो हि नान्यः क्वाऽपि कदाचन ॥ १ ॥**

व्रजाधिपाचें म्हणजे श्रीकृष्णाचें सर्वभावनेनें नेहमीं भजन करावें हाच आपला मुख्य धर्म होय. या शिवाय अन्य धर्म नाहीं. तेव्हां या संप्रदायांत भगवान् श्रीकृष्णालाच श्रेष्ठ दैवत मानिले आहे. भगवंताचे हें महात्म्य जाणून ब्रह्मदेव ऋषिमुनींना उपदेश करितातः— **"तस्मात्कृष्ण एव परमो देवस्तं ध्यायेत् तं रसयेत् तं भजेत्"**— म्हणून श्रीकृष्ण परमश्रेष्ठ देव आहेत. त्यांचें ध्यान करावें. त्यापासून होणाऱ्या आनंदरसाचा आस्वाद घ्यावा. त्यांचें यजन करावें व त्यांचीच भक्ति करावी.

## (४३) सेवा व पूजा यांतील भेदः—

सेवा व पूजा हे शब्द या पुष्टिमार्गांत एकाच अर्थी वापरीत नाहीं. सेवेंत अन्य देवतांची उपासना करीत नाहींत. परंतु ज्या तत्वाला गीता अक्षरातीत म्हणते, श्रुति अक्षराहून पर म्हणते व वेद '**रसो वै सः**' म्हणून संबोधितात, त्याचीच सेवा करण्याचा उपदेश आहे. परंतु पूजेंत पुरुषोत्तमाच्या अंशाची, कलेची किंवा अवताराची पूजा केली तरी ती चालते. तेव्हां सेवेंत देवतापूजन किंवा विभूतिपूजन याला स्थान नसून केवळ परात्पर पूर्ण पुरुषोत्तमाचें सगुण स्वरूप जो श्रीकृष्ण तोच सेव्य घेतला आहे. व या स्वरूपालाच या पुष्टिमार्गांत 'श्रीनाथजी किंवा श्रीठाकुरजी' म्हणतात.

सेवेंत स्नेहबलालाच विशेष प्राधान्य आहे. प्रभूवर सेवकाचें उत्कट प्रेम असतें. तो अत्यंत स्नेहार्द अंतःकरणानें प्रभूची सेवा करीत असतो. परंतु पूजेंत मंत्रबल मुख्य होय. मंत्रविधीनें पूजक पूज्य देवतांचे पूजाअर्चन करीत असतो. त्यांत प्रभुप्रेमाचा इतका उत्कट भाव नसतो. केवळ विधीलाच महत्त्व देऊन विधिवत् जो भगवंताची पूजा करितो, त्याला पूजामर्गीय वैष्णव म्हणतात. त्याला पजामार्गच उत्तम. परंतु निरंतर पूजनानें त्याचा प्रभूप्रति स्नेह वाढत गेला म्हणजे त्याची पूजामार्गीयवृत्ति पालटते. व शेवटीं तो या मार्गाला

येऊन मिळतो. सांप्रदायिक बहुतेक ग्रंथांतून 'सेवा' शब्दाचा उपयोग केलेला आहे. 'पूजा' शब्द कचित् स्थली वापरला आहे. तसेंच भगवंताच्या मूर्तींबद्दल 'मूर्ति' शब्द न वापरतां 'प्रभुस्वरूप' हा शब्द वापरला आहे. कारण त्यांत साक्षात् प्रभु अवतरले आहेत अशी भावना असते. त्यामुळें ती मूर्तिपूजा होत नसून प्रभुस्वरुपाची सेवा होत असते.

## (४४) सेवेंत वात्सल्यभाव पाहिजेः—

पुष्टिमार्गीय वैष्णवभक्त प्रभूच्या सुंदर बालस्वरुपाची सेवा करीत असतो. यांत बालस्वरुपानें प्रभु आपला उद्धार करण्यासाठीं आपल्या येथें प्रकट झाला आहे, अशी भावना असते. माता ज्याप्रमाणें वात्सल्यस्नेहानें बालकाचें मन रिझविते, त्यांचें पोषण करिते, तद्वत् पुष्टिमार्गीय भक्त वात्सल्यस्नेहानें प्रभूची सेवा करितो. अशा सेवेंत स्नेह मुख्य आहे. बालभावपूर्वक जी सेवाभक्ति वैष्णवभक्त करितो, ती निष्कामभक्ति होय. या भक्तीनें प्रभूच्या अनेक लीलांचा अनुभव मिळतो. माता आपल्या बालकावर प्रेम करिते, तें त्याजपासून आपल्यास कांहीं लभ्यांश होईल म्हणून नव्हे. ते निर्व्याज व निःस्वार्थ प्रेम असतें. यामुळें प्रभूपासून मागण्याची वृत्तिच समूळ नाहींशीं होते. व प्रभूवर तो निर्व्याज व निर्हेतुक प्रेम करण्यास शिकतो. तो कसलीहि अपेक्षा करीत नाहीं. माता पूर्ण जाणत्ये कीं, बालक आपल्या इच्छा पूर्ण करण्यास असमर्थ आहे. अशा भावनेनें सेवा झाली म्हणजे याचनेची इच्छा होत नाहीं. तो निरिच्छ बनतो. त्याचें हृदय निरतिशय निष्काम प्रेमानें ओथंबलेलें असते. प्रभु सर्व समर्थ आहे. सर्वज्ञ आहे. तो भक्ताचें हृदय जाणतो. मग त्या भक्ताला याचना ती कोणती करावयाची राहिली ? म्हणून श्रीहरिराय प्रभु म्हणतात—"**प्रार्थना नैव कुत्रापि कर्तव्या भगवत्यपि**"—

कसल्याहि ऐहिक वासनातृप्तीसाठीं प्रभूला प्रार्थना करूं नये. वात्सल्यभावानें प्रेमयुक्त सेवा केल्यास प्रभुप्राप्तींत विलंब लागत नाहीं. माता यशोदेला कृष्ण अति त्रास देत असे. म्हणून ती त्याला खांबाला बांधण्याचा प्रयत्न करीत होती, पण प्रभु बंधनांत येत नव्हते, परंतु मातेनें जेव्हां पूर्ण वात्यल्यस्नेहानें प्रभूकडे पाहिले तेव्हां कुठें ते बंधनांत आले. जो प्रभु तपस्वी, योगी व ज्ञानी यांच्या ध्यानांत किंवा बंधनांत सहसा येत नाहीं, तो मातेच्या वात्सल्यस्नेहांत कसा बांधला जातो, हें आपण वरील उदाहरणावरून पाहिलें. असा बालभाव व प्रेम प्रभूप्रति पाहिजे, व अशाच ठिकाणीं प्रभु विराजमान होतात. व आपल्या भक्तांचें मनोरथ पूर्ण करितात.

**( ४५ ) कलापूर्ण सेवाप्रणालीः—**

माता यशोदेनें शीत उष्णतेच्या ऋतु अनुसार प्रेमानें श्रीकृष्णाची सेवा केली. व त्याचें लालन पालन केलें. तद्वत् श्रीकृष्णाची सेवा करण्याचा उपदेश या पुष्टिमार्गांत केला आहे. ऋतु अनुसार स्वच्छ वस्त्रानें प्रभूचें स्वरूप शृंगारावें व तें उत्तम आभूषणांनीं अलंकृत करावें. पुष्टिमार्गीय मंदीरांतन प्रभूला इतका कौशल्यपूर्ण शृंगार केला असतो कीं, क्षणभर त्या स्वरूपाकडे पाहात उभे रहावेसे वाटतें. त्याच्या मोहक सौंदर्यानें भक्त आकर्षिला जातो. तो तल्लीन होतो. मंदीरांतील रचनाकौशल्यानें क्षणभर तरी तो स्वतःला विसरतो. तो मोहक बालस्वरूपाकडे पाहून आपलें दुःख विसरतो. व आनंदित होतो. त्याला दर्शन सुखाचा लाभ मिळतो. तसेंच तेथील कीर्तन सुद्धां भक्तगण ऋतु अनुसार गातात. त्यांच्या त्या रसिक प्रभूच्या सुस्वर कीर्तन संलापानें तो क्षणभर तरी मुग्ध होतो व भक्तिप्रेमानें भजनांत रंगून जातो. याच कारणास्तव **श्रीविट्ठलनाथजीनीं** आपल्या सेवाप्रणालीकेंत मंदीरांतील रचनाकौशल्याला व कीर्तनाला विशेष महत्व दिले आहे.

## ( ४६ ) भोग हें सेवेचें अंग आहे:—

पुष्टिमार्गीय मंदिरांतून प्रभूची सेवा दोनदां करीत असतात. एक सकाळीं व दुसरीं संध्याकाळीं. सकाळीं–(१) मंगला, ( २ ) शृंगार, ( ३ ) ग्वाल व ( ४ ) राजभोग; व संध्याकाळीं–( ५ ) उत्थापन ( ६ ) भोग ( ७ ) संध्याआरती व ( ८ ) शयन. यामुळें मंगला पासून शयनपर्यंत प्रभूचें आठवेळां निरनिराळ्या स्वरूपांत प्रत्येकवेळीं दर्शन होतें. प्रभूची येथें किशोरावस्था मानल्यामुळें भक्त त्याला अनेकवेळां भोग ( खाद्य पदार्थ ) अर्पण करीत असतो. भोग हें सेवेचें अंग असल्यामुळें दिवसांतून जितक्यावेळां सेवा करण्यांत येते तितक्यावेळां भोग अर्पण केला जातो. कियेक या ठिकाणीं अशी शंका घेतील कीं, प्रभूला मनुष्याप्रमाणें तहानभूक लागत नाही; मग हे भोग कशाला ? तो जर कांही खात नाही, ग्रहण करीत नाहीं किंवा कमलीच मनुष्यापासून अपेक्षा करीत नाहीं तर शास्त्रें त्याला भोग अर्पण करण्याची आज्ञा कां करितात ? देव तर खात नाहीं ही खात्रीच. मग आपल्याच जीभेचें कोडकौतुक पुरविण्यासाठीं भोग नसतील हें कशावरून ? याला उत्तर एवढेंच आहे की, भगवान् विरुद्धधर्माश्रयी आहे. श्वेताश्वतरोपनिपदांत ब्रह्माचें स्वरूप सांगितले आहे ते असें–

**अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः ।**
**स वेत्ति वेद्यं न च तस्यास्ति वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं महान्तम् ॥**

( श्वे. उ. ६९२ )

ब्रह्माला हात, पाय, नेत्र व कर्ण नाहीत. तथापि तें हात पाय नसून चालतें व घेतें. नेत्र नसून तें पाहूं शकतें. कर्ण नसून ऐकूं शकतें. ज्यानें ब्रह्म जाणावयाचें त्याला तें जाणतें, पण त्या ब्रह्माला मात्र कोणी वेत्ता म्हणजे जाणणारा नाहीं. ब्रह्मसूत्रांतहि–' अत्ता

**चराचरग्रहणात्**"—या सूत्रानें श्रीवेदव्यासांनी शुद्ध निर्गुण परब्रह्माचें भोक्तृत्व सिद्ध केले आहे.

कोणकोणते पदार्थ प्रभूला भोग म्हणून अर्पण करावे याबाबतींत श्रीवल्लभाचार्य म्हणतात—

**यद्यदिष्टतमं लोके यच्चातिप्रियमात्मनः ।**
**येन स्यान्निर्वृत्तिश्चित्ते तत्कृष्णे साधयेद्ध्रुवम्॥**(म.नि.प.२३६)

व्यवहारात जे पदार्थ इष्टतम म्हणजे इच्छित किंवा विशेष आवडीचे गणले जातात, जे स्वतःला अतिप्रिय आहेत व ज्यानें अंतःकरणाची निवृत्ति होईल, तसले पदार्थ भगवान् श्रीकृष्णाला अर्पण करावें. वास्तविक भक्ताला प्रभूला भोग अर्पण करण्यासाठीं बाजारांतून कोणतेंहि पदार्थ आणावे लागत नाहीत. तो आपल्या विरहसंपत्तीने सेवोपयुक्त पदार्थ प्रकट करूं शकतो. तो अत्यंत दीनतापूर्वक म्हणतो—

**किमासनं ते गरुडासनाय किं भूषणं कौस्तुभभूषणाय ।**
**लक्ष्मीकलत्राय किमस्ति देयं, वागीश किं ते वचनीयमस्ति ॥**

हे वागीश, ! मी तुझी प्रशंसा कोणत्या शब्दांनी करावी ? गरुडपक्षी हें ज्याचे आसन आहे, त्याला त्यापेक्षा दुसरें चांगलें आसन कोणतें द्यावें ? कौस्तुभमणि हें ज्याचे भूषण आहे, त्याला दुसरे भूषण कोणतें द्यावे ? प्रत्यक्ष लक्ष्मी ही ज्याची भार्या आहे, अशा ऐश्वर्यसंपन्न तुला देण्यास मजजवळ काय आहे ?

## ( ४७ ) सेवा क्रियात्मक नको, भावात्मक पाहिजेः—

सेवा करिताना मनाचा व्यापार दुसराच चालला असल्यास ती सेवा प्रभूला पोंचत नाहीं. कारण त्यांत भक्तीचा ओलावा नसतो. प्रभु भावाचा—भक्तीचा भुकेला आहे. त्याला तुमची यांत्रिक सेवा नको. सेवा करतांना मनाची एकाग्रता झाली पाहिजे. एकदा एक

वैष्णवशेठ आपली स्नानादिकर्में आटोपून प्रभुसेवा करण्यास बसले होते; पण त्यांचें सारें लक्ष दुसरीचकडे होतें. ते सेवा करीत असतां एकजण त्यांच्या घरांत येऊन विचारूं लागला—' शेठ कुठें आहेत ?' तेव्हां त्यांची सून म्हणाली—' शेठ चांभाराच्या घरीं जोडे आणण्यास गेले आहेत.' ती अतिशय सेवाशील स्त्री होती. रोज तीच सेवा करीत असे. परंतु त्या दिवशीं सेवा करण्याचें काम शेठजीकडे आलें होतें. तिनें आपल्या सेवेच्या प्रतापानें आपल्या सासऱ्याचें मनोगत तेव्हांच ओळखलें होतें. वरील तिच्या जबाबानें शेठ अति खिन्न झाले. आपला दोष त्यांना दिसून आला. त्यांनीं लगेच आपल्या सेवाशील सूनेची क्षमा मागितली. सांगण्याचें तात्पर्य हें कीं, चित्तवृत्ति दुसरीकडे गहाण ठेवून केवळ कृष्ण ! कृष्ण ! बडबड करण्याची सेवा क्रियात्मक असते. त्याला फक्त बाह्यात्काराचें अवडंबरच असते. त्यांत अंतःकरणाची ओढ बिलकूल नसल्यामुळें ती फुटक्या नावेसारखी व्यर्थ होय.

बहुतकरून वैष्णवाच्या घरीं प्रभुसेवा स्त्रीयाच करीत असतात. त्या सेवेस अनुकूल पाहिजे. या बाबतींत जर भार्यादिक उदासीन असतील तर वैष्णवानें स्वतः सेवा करावी. व त्या विरुद्ध असल्यास त्यांचा त्याग करावा. याप्रमाणें स्वधर्माचरणानें सेवा करीत असतां भगवंतांत रति उत्पन्न होते. अन्य व्यवसायांत वेळ जाण्यापेक्षां प्रभुसेवेंत तो गेला तर सत्कारणीं लागतो. व त्यानें मनुष्याला प्रसन्नता वाटते व शांति लाभते. इतर आचार्य व धर्मगुरु अनेक व्रतें, उद्यापनें उपवास व संसारत्याग वगैरे करण्याचा उपदेश करितात. परंतु पुष्टिमार्गीय आचार्य संसारांत राहून त्यांत—कमलाला जसें पाणी चिकटत नाहीं तसें-आसक्त न राहतां वैष्णवांना ही भगवत्सेवेची रीत दर्शवितात. सेवाशील वैष्णव तपश्चर्या करीत नाहीं, कीं एकांतांत

जीवन व्यतीत करीत नाहीं. प्रभुसेवेशिवाय तो कसलीहि अपेक्षा करीत नाहीं. प्रभुसेवा हाच त्याचा धर्म होय.

**(४८) सेवेंत प्रतिबंधः—**

**" उद्वेगः प्रतिबंधो वा भोगो वा स्यात्तु बाधकः " ॥ २ ॥**

( सेवाफल )०

सेवा करीत असतांना उद्वेग, लौकिक आसक्ति व भोग म्हणजे विषयोपभोग हे तीन बाधक होत. यामुळें सेवा बरोबर होत नाही. प्रभूंत एकाग्र चित्त लागत नाहीं. व्यवहारांत कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्यामुळें सेवेंत नानातऱ्हेच्या अडचणी येतात. तेव्हां याचा सर्वस्वी त्यागच केला पाहिजे. व तो कसा करावा हें खाली दिलें आहे.

( १ ) **उद्वेगः**—उद्वेग म्हणजे मनांत कसली तरी चिंता राहणें. या चिंतेमुळें सेवा बरोबर होत नाहीं. म्हणून जेणेंकरून चित्त प्रसन्न राहील असें पवित्र ग्रंथ वाचावे. मनुष्य किती कां उद्विग्न असेना, त्याची ती उद्विग्नता नाहीशीं करण्याचें सामर्थ्य **श्रीवल्लभाचार्यांचे** ' नवरत्न ' व ' अंतःकरणप्रबोध ' या ग्रंथांत आहे. त्यांचे वाचन करावें म्हणजे चित्त नेहमीं प्रसन्न राहील.

( २ ) **प्रतिबंधः**—याचे प्रकार दोन ( १ ) जीवकृत व ( २ ) भगवत्कृत. पैकीं पहिला मनुष्यानें आपल्या अज्ञानानें निर्माण केलेला प्रतिबंध होय. त्याचा त्याग करण्यास लौकिक आसक्तीचाच त्याग करावयास पाहिजे. व हिचा त्याग कसा करावा हें मागेंच सांगितलें आहे, ( प्यारा १६ पहा ). त्याची येथें पुनरावृत्ति नको. आतां दुसरा भगवत्कृत प्रतिबंध असल्यामुळें त्याला उपाय नाहीं. परंतु त्यानें जर प्रभूचें शुद्ध अद्वैत ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न केला तर हा प्रतिबंध टाळण्यासारखा आहे.

( ३ ) **भोगः**—भोगाचेंहि प्रकार दोन ( १ ) लौकिक भोग **अर्थात्** विषयोपभोग व ( २ ) अलौकिक भोग. यापैकीं पहिल्यानें मन चंचल होतें व प्रभूवर शुद्ध प्रेम टिकत नाहीं. याचा इंद्रिय-निग्रहानें त्याग केला पाहिजे. प्रभूसेवेंत जसजसें मन तल्लीन होईल तसतसें या विषयोपभोगाचें निर्मूलन होतें. आतां शेवटीं राहि-लेला अलौकिक भोग. परंतु हा भोग बाधक नसून प्रभुसेवेला साधक आहे. मागश, उद्वेग, लौकिक आसक्ति व विषयोपभोग हें सेवेंत प्रतिबंधक असल्यामुळें या त्रिपुटींचा सर्वस्वी त्याग करावा, अशी **श्रीवल्लभाचार्यांची** आज्ञा आहे

( ४९ ) **सेवेचें प्रकारः**—

आपण सेवा म्हणजे काय हे पाहिले, आता सेवा किती प्रकारें होऊ शकते हे पाहू:—

**चेतस्तत्प्रवणं सेवा तत्सिद्ध्यै तनुवित्तजा ।**
**ततः संसारदुःखस्य निवृत्तिर्ब्रह्मबोधनम् ॥२॥** (सि. मु.)

सेवा ह्मणजे प्रभूच्या ठिकाणीं चित्ताची एकतानता करणें. हिला मानसी ( मन ) सेवा ह्मणतात. व तिच्या सिद्धीसाठीं तनुजा (तन) व वित्तजा ( धन ) सेवा होय. त्यांच्यापासून संसार निवृत्ति व ब्रह्माचा बोध होतो.

एकदर सेवेचे प्रकार तीन. ( १ ) तनुजा ( तन ) सेवा, ( २ ) वित्तजा ( धन ) सेवा व ( ३ ) मानसी ( मन ) सेवा यापैकीं पहिल्या दोन साधनरूप आहेत. व तिसरी फलरूप आहे.

( १ ) **तनुजा सेवाः**—शरीरानें ह्मणजे देहेंद्रियानें जी सेवा केली जाते तिला ' तनुजा ' सेवा ह्मणतात. उदाहरणार्थ—प्रभुचरित्र ऐकणें. त्याचे गुणगान किंवा मनन करणें व आपलीं सर्व इंद्रियें प्रभूकारणे योजिणें वगैरे.

( २ ) **वित्तजा सेवाः**—द्रव्यानें जी सेवा केली जाते तिला 'वित्तजा' सेवा म्हणतात. सर्व ममतेचें मूल जें वित्त त्याचा विनियोग प्रभुकारणें करणें म्हणजेच वित्तजासेवा होय. उदाहरणार्थ—श्रीठाकूरजीच्या सेवेंत द्रव्य विनियोग करणें, सांप्रदायिक ज्ञानाच्या प्रसारार्थ साहित्य निर्माण करणें, इत्यादि. परंतु पगार देऊन ब्राह्मणाकडून जी भाडोत्री सेवा केली जाते तिला वित्तजा सेवा म्हणत नाहीं.

( ३ ) **मानसी सेवाः**—मन प्रभुपरायण बनवून सेवा करणें, मन तदाकार बनविणें, किंवा अंतःकरण प्रभुचे ठिकाणीं लावणें याला 'मानसी' सेवा म्हणतात; भक्त तनुजा व वित्तजा या दोन्हीं प्रकारची सेवा करीत राहिला म्हणजे परमेश्वराचे ठिकाणीं त्याच्या चित्तवृत्ताचा पूर्णपणें लय होतो, व मग मानसी सेवा तो आपोआप करूं लागतो. पहिल्या दोन साधनरूप असतात तर शेवटची मानसीसेवा फलरूप असते.

तनुजा सेवेनें संसारांतील अनर्थोत्पादक अहंकार नष्ट होतो. व वित्तजा सेवेनें ममतेचा नाश होतो. अर्थात् अहंकार व ममत्व यांनीं परिपूर्ण असलेल्या संसारांतून तो निवृत्त होतो. व ही निवृत्ति झाली म्हणजे त्याला ब्रह्माचा बोध होण्यास सुलभ जाते.

दुसऱ्या दृष्टीनें विचार केला असतां तनुजा सेवेनें भक्ताचें संसारावरील प्रेम उठून तें प्रभूचे ठिकाणीं जोडले जातें. संसाराचा त्याला वीट येतो. प्रभूच्या प्रेमळ व गोड भजनांत तो रंगतो. त्याला प्रभूविषयीं अमर्याद प्रेम वाटूं लागतें. यामुळें त्याला ब्रह्माचें ज्ञान होण्यास सोपें जातें. आणि वित्तजा सेवेनें प्रभूवर अनन्य आसक्ति उत्पन्न होते. गृहांत अनात्मत्व भासूं लागतें. तो संसारनिवृत्त होतो. त्यामुळें त्याला वैराग्य प्राप्त होते. सारांश, या दोन्हींप्रकारच्या सेवेनें त्याला संसारनिवृत्ति म्हणजे वैराग्य व ब्रह्माचें ज्ञान प्राप्त होतें.

हें अवांतर मध्यम फल होय. उत्तम फल तर मानसी सेवात्मक व्यसन होय. अर्थात् तनुवित्तजा सेवा करणारा भक्त किंवा सेवक ज्ञान—वैराग्यद्वारा संसारनिवृत्तीलाच परम पुरुषार्थ मानीत नसतो; परंतु संसारनिवृत्तिपूर्वक परमानन्दप्राप्ति हाच सर्वोत्कृष्ट पुरुषार्थ आहे असें तो समजतो. हा पुरुषार्थ त्याला मानसी सेवेनें प्राप्त होतो. ही अंतिम मानसी सेवा व्यसनदशेची पराकाष्ठा होय. म्हणून **श्रीवल्लभाचार्य** म्हणतात—

**स्नेहाद्रागविनाशः स्यादासक्त्या स्याद्गृहारुचिः ॥ ४ ॥**
**गृहस्थानां बाधकत्वमनात्मत्वं च भासते ॥** ( भ. व. )

प्रभूवरील स्नेहानें अन्य वस्तूंवरील प्रेम नाहीसे होतें व आसक्तीनें गृहदारादि विषयात अरुचि उत्पन्न होते. इतर सर्व लौकिक पदार्थांवरील स्नेह नाहीसा होतो व प्रभूवर दृढ प्रेमभाव उत्पन्न होतो. याप्रमाणे प्रेम व आसक्तीने भक्तिवृद्धीचा प्रकार निरूपण करून शेवटी ते तृतीय व्यसन अवस्थेचे प्रतिपादन करतांना म्हणतात—" **यदा स्याद्व्यसनं कृष्णे कृतार्थः स्यात्तदैव हि**—जेव्हां श्रीकृष्णासंबंधी व्यसन प्राप्त होईल तेव्हांच तो भक्त कृतार्थ होईल."

## ( ५० ) मानसीसेवा श्रेष्ठ होयः—

प्रभूची अंतःकरणपूर्वक मानसी सेवा करीत असतांना जसजसा उत्कट भाव होत जातो, तसतसा सर्वात्मभाव व्रजांगनांप्रमाणें अनुभवावयास मिळतो. कारण हा सर्वात्मभाव त्यांनी अनुभविला आहे. सर्वात्मभाव म्हणजे भगवंताविषयीं निरुपाधि स्नेह किंवा भक्ति. जसें आपल्या आत्म्याविषयीं शुद्ध प्रेम असतें तसे तें भगवंताचे ठिकाणीं ठेविणें याला सर्वात्मभाव म्हणतात. हा सर्वात्मभाव अत्यंत विरही दशेला पोंचलेल्या किंवा ज्याला व्यसनदशा प्राप्त झाली आहे अशा भक्तालाच

प्राप्त होऊं शकतो. तो थोड्याच अवधींत–' **मद्भावः सर्वभूतेषु**' माझ्या ठिकाणीं भक्ति प्राप्त करितो ( भा. ११–१७–३५ ). या सेवेनें तो भगवंताच्या आनंदमय स्वरूपाचा अनुभव मिळवितो. श्रीहरिरायजी म्हणतात—

**सर्वभावेन सा कृष्णस्वरूपानन्ददायिनी ।**
**तया निरुद्धो भवति हृदये रसरूपतः ॥ ६ ॥**

पुष्टिपथमर्मनिरूपणम् ।

' माझें सर्व कांहीं श्रीकृष्णच आहे.' अशा भावनेनें केलेली भक्ति श्रीकृष्णाच्या श्यामसुंदर स्वरूपाचा आनंद देणारी होते. त्या भक्तीनें बद्ध झालेला प्रभु पण या सेवेच्या आधीन होऊन भक्ताच्या हृदयांत रसात्मकरूपें विराजमान होतो. म्हणून **श्रीवल्लभाचार्य**, आपल्या 'सिद्धांत मुक्तावली ' या ग्रंथाच्या प्रारंभीं आज्ञा करितात कीं–"**कृष्णसेवा सदा कार्या मानसी सा परा मता** "–श्रीकृष्णाची सेवा नेहमीं करावी. व या सेवेत मानसी म्हणजे प्रभुचिंतनपर सेवा उत्तम होय. ( सि. मु.१ ). ब्रह्मदेवानीं वेदांचें तीन वेळां परिशीलन केलें, व ते या एका निर्णयावर आले कीं, भगवंताचे ठिकाणीं निस्सीम प्रेम ठेविणें हाच मनुष्याचा मुख्य धर्म होय. व तें प्रेम त्याच्या अनन्य सेवेनेंच प्राप्त होतें. ( भा. २–२–३४ ).

### ( ५१ ) सेवेची फलश्रुतिः—

आपण मागें साधनरूप तनुजा, वित्तजा ( तन व धन ) सेवा व फलरूप मानसी (मन) सेवा या तीन प्रकारच्या सेवेचा विचार केला. यापैकीं साधनरूप सेवेनें म्हणजे तनुवित्तजा सेवेनें अहंकार व ममत्व यांचें निर्मूलन होऊन संसारदुःखाची निवृत्ति व ब्रह्मबोध कसा होतो हें आपण पाहिलें. व हीच साधनसेवा करींत असतां मानसी

सेवा कशी प्राप्त होते हें सुद्धां पाहिलें. आतां या मानसी सेवेच्या फलाविषयीं सांप्रदायिक ग्रंथकार काय म्हणतात तें पाहूंः—

या मानसीसेवेनें तीन प्रकारचें फल मिळतें. तें असें:—

( १ ) **वैकुंठांत सेवोपयोगी देहः**—हें साधारण फल होय. परमानंद प्रभूच्या लीलारसाचा अनुभव घेणाऱ्या भक्तांच्या सहवासाचा लाभ मिळतो.

( २ ) **सायुज्यः**—हें मध्यम फल आहे. प्रभुसमागमांत राहाण्याची व त्यासह क्रीडा करण्याची योग्यता मिळते. प्रभूच्या आनंदाची क्रीडा त्याच्या हृदयांत निरंतर चालू असते, त्याच्या जीवनक्रमांत प्रभुप्राप्तीची इच्छा सदैव व्यक्त होत असते. व्रजभक्तांप्रमाणें प्रभूबरोबर हसणें, बोलणें, नाचणें, खेळणें वगैरे आनंद तो मिळवितो. याला ' सायुज्यमुक्ति ' म्हणतात.

( ३ ) **अलौकिक सामर्थ्यः**—हें फल सर्वांत उत्तम होय. ज्याची प्रभूचे ठिकाणीं निर्हेतुक प्रेमभक्ति आहे, ज्याला प्रभूचा विरह असह्य होतो अशा व्यसनदशेला पोंचलेल्या भक्ताला तो आपला आनंद भोगण्याचें अलौकिक सामर्थ्य देतो. अशा भक्ताला ब्रह्माचा बोध अगोदरच झालेला असतो. तो—" **ब्रह्मविदाप्नोति परम्** "— ब्रह्मविद् ह्मणजे ब्रह्म जाणणारा भक्त पर ह्मणजे पुरुषोत्तमाची प्राप्ति करून घेतो (तै.उ.२।१) सर्व लीलाभावपूर्वक प्रभूसह पूर्णानंद भोगतो. असें पूर्णानंद भोगणाऱ्या भक्ताबद्दल श्रुति ह्मणतात —" **सोऽश्नुते सर्वान् कामान् सह ब्रह्मणा विपश्चिता**—" विविध भोगचतुर परब्रह्मासह तो मुख्यत्वेंकरून सर्व काम-मनोरथ भोगतो. (तै.उ.२।१) हें उत्तम व अद्भुत सामर्थ्य कसें मिळतें याचा ब्रह्मसूत्रकारांनीं दृष्टांत दिला आहे. तो असा—एक दिवा दुसऱ्या सतैल स्निग्ध वातीला पेटवूं शकतो. तद्वत् भगवान्

या स्नेहयुक्त प्रभुदर्शनार्थ विव्हल झालेल्या भक्ताच्या हृदयांत प्रवेश करून त्याची अंतस्थ चैतन्य ज्योत प्रज्वलित करितात; त्याला आपला परमानंदाचा अनुभव भोगण्याचे अलौकिक सामर्थ्य देतात. असें सामर्थ्य प्रभूंनी व्रजभक्ताना दिलें होते. कारण त्यांनी जी भक्ति केली ती सर्वांत श्रेष्ठ भक्ति होती.

मानसी सेवेची ही तिन्ही फले आपण पाहिलीं व परमानंदाची प्राप्ति कशी होते तेंहि पाहिले. या सेवाफलाला काल बाधा करूं शकत नाही. कारण तें नित्य आहे, व तें जीवकृतिसाध्य नसून परमेश्वराच्या अनुग्रहानेंच साध्य होतें. वास्तविक व्यसनदशेला पोंचलेला भक्त कसलीहि अपेक्षा करीत नाही. तो निरपेक्ष असतो. तो मुक्तीचीहि पर्वा करीत नाहीं. ही श्रीकृष्णाची सेवा पुरुषार्थरूप असल्यानें पूर्ण दशेला प्राप्त झालेला भक्त त्याच्या भक्तीशिवाय कोणत्याहि वस्तूची अपेक्षा करीत नाहीं. भगवान् दुर्वास ऋषींना ह्मणतात—

**मत्सेवया प्रतीतं च सालोक्यादि चतुष्टयम् ।**
**नेच्छन्ति सेवया पूर्णा कुतोऽन्यत्कालविद्रुतम् ॥**

( भा. ९–४–६७ )

"हे दुर्वासमुने ! माझ्या ठिकाणीं त्यांची इतकी श्रद्धा असते, कीं माझ्या कृपेनें सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता ह्या चारहि मुक्ति प्राप्त होत असतां, त्या सर्वश्रेष्ठ पदांची इच्छा न करतां ते निरंतर माझ्याच सेवेची इच्छा करतात. मग इतर विनाशी वस्तूची कथा काय ?

**( ५२ ) विश्वोद्धारक सेवाधर्मः—**

मनुष्याच्या कल्याणासाठीं शास्त्रकारांनीं अनेक धर्म सांगितले आहेत; परंतु असा एक धर्म असला पाहिजे कीं, जो सर्व प्राणिमात्र

पाळूं शकतील, जो सर्वांना जीवन देईल. जो सर्व पापांचें निर्मूलन करील, जो सर्वकाळीं व सर्व देशांत आचरण्यास सुलभ होईल, जो सर्वत्र सुखशांतीचें साम्राज्य उत्पन्न करील व जो अखिल विश्वाचा उद्धार करील. **श्रीवल्लभाचार्य** व इतर ब्रह्मवादी तत्त्ववेत्ते अशाच एका महान् धर्माचा उपदेश करितात व तो धर्म म्हणजे हा सेवाधर्म होय. प्रभुप्रेमाच्या पराकाष्ठेवरच हा धर्म रचलेला असल्यामुळें 'सर्वत्र प्रभु भरलेला आहे,' अशी तो धर्म आचरणाऱ्याची भावना होते. अन्याचा द्वेष म्हणजे प्रभूचा द्वेष होय: म्हणून सर्वत्र समभाव व दया हा त्याचा गुण होतो.

सेवाधर्माने प्रभुप्रेमाचा प्रवाह त्याच्या अंतःकरणांत अविच्छिन्न वाहात असतो. तेव्हां असत्य भाषण व क्रोधादि विकार त्याच्याठिकाणीं संभवूं शकत नाहीं. असत्य विचारांना तो आपल्या मनांतून घालवून देण्याचा सदैव प्रयत्न करीत असतो व अंतःकरणांतील दुष्ट विकारांना थारा देत नाही. तो आपलें भक्तिरूप पुष्प प्रफुल्लित ठेवित असतो.

सेवाधर्माचें सदाचार व शुद्धचारित्र्य हे एक अंग आहे. शुद्ध व निर्मल अंतःकरणाशिवाय त्याला प्रभूची सेवा करितां येत नाहीं. म्हणून तो आपला देह व अंतःकरण सदैव निष्कलंक ठेवितो.

**श्रीवल्लभाचार्य** म्हणतातः—

**" भगवद्रूपसेवार्थं तत्सृष्टिर्नान्यथा भवेत् ॥१२॥** (पु. म.)

प्रभुसेवेसाठीं सृष्टीची उत्पत्ति झाली आहे. अन्यथा नाहीं. म्हणून आपल्या सर्व क्रियेचें पर्यवसान भगवंताच्या सेवेंतच झालें पाहिजे. या त्याच्या उपदेशानुसार तो वागण्याचा प्रयत्न करितो. या सेवाधर्मासाठीं प्रभूनें आपल्यास सामर्थ्य द्यावें म्हणून

कविश्रेष्ठ रवींद्रनाथ टागोर आपल्या विश्वविख्यात गीतांजलींत प्रार्थना करितात–" Give me the strength to make my labcur fruitful in service" [ज्या सामर्थ्याच्या योगानें माझ्या सेवारूप प्रेमास फल प्राप्त होईल, असें सामर्थ्य मला दे. ]

या सेवाधर्मांत परमेश्वराच्या गानपर स्तुतीसच नेहमीं प्राधान्य दिलेले असतें; कारण यामुळें भक्ताची ईश्वरनिष्ठा कायम राहाते. प्रभूच्या मधुर व प्रेमळ संगीतांत तो तल्लीन होतो. अशा सेवापरायण भक्ताला **श्रीवल्लभाचार्य** आश्वासन देतात कीं–

**सेवायां वा कथायां वा यस्यासक्तिर्दृढा भवेत् ॥**
**यावज्जीवं तस्य नाशो न क्वापीति मतिर्मम ॥९॥** (भ. व.)

"प्रभूची सेवा किंवा कथा या दोहोंपैकी एकावरहि ज्याची जीवन पर्यंत दृढ आसक्ति होईल, त्याचा कोठेंहि नाश होत नाहीं. अर्थात् जो प्रभूच्या सेवेंत किंवा गुणगानांत आजन्म निमग्न झालेला असतो तो अजर व अमर होतो. "

सेवाधर्मानें वागत असतां त्याला–' **सर्वं खल्विदं ब्रह्म** '–हें सर्व ब्रह्ममय दिसूं लागतें आणि हें अखिल विश्व प्रभूचें क्रीडास्थल किंवा क्रीडांगण असून ब्रह्ममय आहे, ही भावना उद्दीपित झाली ह्मणजे– '**वसुधैव कुटुम्बकम्**–' पृथ्वीवर जें कांही भूतमात्र व पदार्थ मात्र आहे, तें सर्व माझेंच आहे अशी समदृष्टि होऊन तो विश्वबंधुत्वाच्या नात्यानें जगाकडे पाहाण्यास सुरवात करितो. जग मिथ्या आहे म्हणून तो त्याचा त्याग करीत नसून त्यावरील प्राणिमात्राचीच तो सेवा करीत राहातो. कीटकापासून ब्रह्मापर्यंत जितके जीव आहेत, त्या सर्वांची सेवा हीच परमात्म्याची सेवा असें तो समजतो. तो ही विश्वबंधुत्वाची भावना जनहृदयांत स्थित करून या जगांत जी

जनता मिथ्या ममतेला चिकटून राहिली आहे, त्या मिथ्या ममत्वापासून तिला मुक्त करून मनुष्यजन्माची सार्थकता काय व ती कशी प्राप्त होईल हें आपल्या सेवाधर्मानें तिला शिकवितो; व नंतर प्रभूच्या खऱ्या अनुग्रहाला त्या जनतेला आपल्या उपदेशानें पात्र करून या मार्गाचा निस्सीम अनुयायी बनवितो. यावरून हा धर्म किती उच्चतम व उदात्त तत्वावर अधिष्ठित केलेला आहे हें निराळें सांगावयांस नको. तात्पर्य, हा एक विश्वोद्धारक धर्म होय. प्रभु यानेंच प्रसंन्न होतात. खऱ्या कल्याणाचा हाच सर्वश्रेष्ठ धर्म होय.



# रत्न ७ वें

## पुष्टिभक्ति.

या जगांत आपण नानातऱ्हेचे लोक पाहातों. त्यांचे साधारण रितीनें दोन भाग करितां येतील, एक चांगले व दुसरे वाईट. यांनाच गीतेंत दैव व आसुर प्राणी म्हटलें आहे. आसुर हे स्वभावतःच दुष्ट असतात, आणि दैव हे सद्गुणसंपन्न असतात. ते सदैव प्रभुभजनांत निमग्न असतात. अशा दैवी संपत्तीच्या भक्ताच्या भक्तीविषयीं पुष्टिमार्गाच्या दृष्टिबिंदूनें आपणांस आतां विचार करावयाचा आहे.

**( ५३ ) पुष्टिभक्तीचें स्वरूपः—**

या मार्गांत दैवी भक्त दोन प्रकारचे मानले आहेत. एक मर्यादा भक्त व दुसरा पुष्टिभक्त. जे शास्त्रात सांगितलेल्या विशिष्ट मर्यादा ( नियम ) पाळून भक्ति करितात, त्यांना ‘ मर्यादाभक्त ’ व जे केवळ प्रभूच्या अनुग्रहावरच विश्वस्त राहून भक्ति करितात त्यांना ‘ पुष्टिभक्त ’ म्हणतात.

‘ मर्यादा व पुष्टि ’ या दोन शब्दांचें स्पष्टीकरण करितांना अणुभाष्यकार **श्रीवल्लभाचार्य** खालीलप्रमाणें त्यांतील फरक दाखवितात—

**“ कृतिसाध्यं साधनं ज्ञानभक्तिरूपेण शास्त्रेण बोध्यते ताभ्यां विहिताभ्यां मुक्तिः मर्यादा। तद्रहितानामपि स्वस्वरूपबलेन कार्यकारणे हि पुष्टिः। ”** (अणुभाष्य ३–३+२८)

मनुष्याला आचरण्यास किंवा करण्यास शक्य अशीं कर्म, ज्ञान व भक्ति हीं साधनें शास्त्रांत सांगितलीं आहेत. तीं आचरणांत

आणल्यानें जी मुक्ति मिळते तिला ' मर्यादा ' म्हणतात व वरील साधनांची पर्वा न करितां केवळ स्वतःच्या प्रमेयबलावर जी भगवंताची प्राप्ति करून देते, तिला ' पुष्टि ' म्हणतात. मर्यादाभक्त मर्यादामुक्तीची इच्छा करितात. पुष्टिभक्त पुष्टिमुक्तीची इच्छा करितात. प्रभु प्रत्येकाच्या अधिकारपरत्वे त्याजवर कृपादृष्टि करितात. जशी ज्याची भक्ति तसे त्याला फल लाभतें. यामुळें जगांत जी कमी अधिक प्रभूची कृपा दिसून येते. त्याचें कारण कळेल व याच कारणास्तव साम्प्रदायिक ग्रंथकारांनीं पुष्टिभक्तांचे चार प्रकार कल्पून त्यांच्या भक्तीचें स्वरूप वर्णन केले आहे.




या भक्तांचे प्रथम दोन प्रकार केले आहेत. एक मर्यादा भक्ति व दुसरी पुष्टि भक्ति. त्यानंतर पुष्टिभक्तीचे पुन्हां दोन प्रकार कल्पून त्यांना 'मिश्र' व 'शुद्ध' अशीं नांवें दिलेलीं आहेत. त्यापैकीं मिश्रपुष्टिभक्तींत तीन प्रकारच्या भक्तीचा समावेश होतो. पहिली प्रवाह, दुसरी मर्यादा व तिसरी पुष्टि. एकंदरींत या भक्तांचे चार प्रकार झाले. ते असे—(१) प्रवाहपुष्टिभक्ति, (२) मर्यादापुष्टिभक्ति, (३) पुष्टिपुष्टिभक्ति व (४) शुद्धपुष्टिभक्ति. वरील प्रमाणें

भक्तांचेसुद्धां चार प्रकार होतात. आतां या प्रत्येक भक्तांच्या भक्तीचं स्वरूप कसें असतें तें पाहूं.

( १ ) **प्रवाहपुष्टिभक्त**:–प्रवाह म्हणजे संसार व पुष्टि म्हणजे भगवंताचा अनुग्रह. हे संसारांत आसक्त राहून भक्ति करितात. म्हणून यांना ‘ प्रवाहपुष्टिभक्त ’ म्हणतात. हे स्वार्थबुद्धि मनांत ठेवून कांहीं विशिष्ट हेतूस्तव परमेश्वराची भक्ति करणारे भक्त होत. यांना गीतेंत ‘ अर्थार्थी ’ म्हणजे द्रव्यादिक काम्यवासना मनांत ठेवणारे भक्त म्हटलें आहे. यांच्या भक्तीची पायरी कनिष्ठ होय. यांना फक्त वैकुंठांत सेवोपयोगी देह प्राप्त होतो. उदाहरणार्थः– श्रुतदेव व निमिराजा हे प्रवाहपुष्टि भक्त होत.

( २ ) **मर्यादापुष्टिभक्त**:–मर्यादा म्हणजे शास्त्रोक्त नियम व पुष्टि म्हणजे भगवंताचा अनुग्रह. हे संसाराच्या चित्रविचित्र विषयांत आसक्त नसतात. यांचें मन निवृत्तीकडे लागलेलें असतें. शास्त्रविहित श्रवण–मननादि भक्ति करणें, व प्रभुगुणगान करणें यांना आवडतें. हे आपणांस परमेश्वराचें ज्ञान व्हावें अशा हेतूनें भक्ति करीत असतात. यांना गीतेंत ‘ जिज्ञासु ’ भक्त म्हटलें आहे. यांच्या भक्तीची पायरीसुद्धां कनिष्ठच होय. **श्रीवल्लभाचार्य** यांना ‘ गुणज्ञ ’ म्हणजे प्रभूचें गुणगान जाणणारे असें म्हणतात. यांना फक्त सायुज्यमुक्ति मिळते. उदाहरणार्थ–भीष्माचार्य हे मर्यादापुष्टि भक्त होत.

(३) **पुष्टिपुष्टिभक्त**:–हे केवळ भगवत्प्रीत्यर्थच कर्माचें आचरण करीत असतात. प्रवाह व मर्यादा या भक्तांपेक्षां यांच्यावर भगवंताचा अनुग्रह अधिक प्रमाणांत असतो. यांना भगवंताचें गुणगान व स्वरूप यांचें पूर्णपणें ज्ञान झालेलें असतें. यामुळें ते प्रभूची लीला यथार्थ जाणतात. ज्ञानप्राप्तीनें कृतार्थ झाल्यामुळें यांना करावयाचें किंवा मिळ-

वावयाचें कांहीं शिल्लक राहिलेलें नसतें. यांना गीतेंत 'ज्ञानी' भक्त म्हटलें आहे. यांच्या भक्तीची पायरी श्रेष्ठ होय. यांना **श्रीवल्लभाचार्य** 'सर्वज्ञ' असें म्हणतात. यांना आपल्या सेवेचें फल म्हणून अलौकिक सामर्थ्य प्राप्त होतें. उदाहरणार्थ—नारद व वृषभदेव हे पुष्टिपुष्टिभक्त होत.

(४) **शुद्धपुष्टिभक्तः**—हे केवल प्रभूचें प्रेम संपादन करावें या हेतूनेंच भक्ति करीत असतात. यांना प्रभुकृपेखेरीज कसलीहि अपेक्षा नसते. हे प्रभुप्राप्तीसाठीं कोणत्याहि साधनांची पर्वा करीत नाहीत. यांना साधनरूप श्रीकृष्ण आणि साध्यरूपहि श्रीकृष्णच असतात. प्रत्यक्ष भगवान् जेथें साधनरूप आहे, तेथें इतर साधनांची आवश्यकता ती काय? ह्यांच्या भक्तीला निस्साधन भक्ति म्हणतात. प्रभु हा निस्साधनाचा अधिप आहे. त्यांत निस्साधन भक्तांचा उद्धार करण्याचें सामर्थ्य आहे. अशा भक्ताच्या कल्याणासाठींच प्रभूंनीं गोकुळांत अवतार घेतला, याचे समर्थन करितांना **श्रीविठ्ठलनाथजी** म्हणतात—

**निस्साधनफलात्माऽयं प्रादुर्भूतोऽस्ति गोकुले।**
**अतो वयं हि निश्चिन्ता जाताः सर्वत एव हि ॥**

निस्साधनाचा फलरूपात्मा प्रभु गोकुळांत प्रकट झाला आहे. म्हणून आम्ही सर्व प्रकारें निश्चित झालों आहोंत. तेव्हां ज्या भक्तींत परमफलरूप प्रभुप्राप्तीसाठीं सर्व साधनांचा अभाव असतो तीच शुद्धपुष्टिभक्ति होय. '**—भक्तिः शुद्धा स्वतंत्रा च दुर्लभेति—**' ही भक्ति शुद्ध, स्वतंत्र व दुर्लभ आहे. ( त. दी. नि. )

या भक्तीनें प्रभु स्वतःच वश होतात. **श्रीवल्लभाचार्य** आपल्या 'तत्त्वदीपनिबंध' ग्रंथांत म्हणतात—"**कृष्णाधीना तु मर्यादा स्वाधीना पुष्टिरुच्यते—**" कृष्णाच्या आधीन होणें ही तर मर्यादाभक्ति होय.

परंतु जी कृष्णाला स्वतःच्या शुद्ध पुष्टिभक्ताच्या आधीन करते ती पुष्टिभक्ति होय. प्रभु भक्ताच्या आधीन होणें हीच पुष्टिभक्तीची पराकाष्ठा !–" **भर्ता सन् भ्रियमाणो बिभर्ति** "– असें श्रुति म्हणते. त्याचें रहस्य हेंच की, विश्वाचें भरण पोषण करणारा यशोदोत्संगलालित प्रभु नंद व यशोदा यांजकडून–आपल्या भक्तांकडून–पोपला जातो. माता यशोदा प्रभूवर रागावते. प्रभु भितात. वात्सल्यस्नेहामुळें ईश्वराचे शिक्षा करण्याचे धर्म माता यशोदेंत आले व भिण्याचे जीवधर्म ईश्वरांत आले. अशी अदलाबदल झाली ती कां ? याचें उत्तर प्रभु स्वतः दुर्वासांना देतात कीं– " हे विप्रा दुर्वासा ! कोणी देव किंवा मनुष्य जसा परतंत्र असतो, तसा मी परतंत्र आहें, भक्तांच्या आधीन आहें. यांच्या भक्तीनेंच माझें हृदय त्यांना जोडलें जातें. माझ्या भक्तीशिवाय मला अन्य प्रिय नाहीं. " ज्या भक्तीला कपिल महामुनींनीं निर्गुणभक्ति म्हटलें आहे, तिलाच **श्रीवल्लभाचार्य** शुद्धपुष्टिभक्ति म्हणतात. ही ईश्वरकृतिसाध्य अनुग्रहात्मक भक्ति होय. याचेंच नांव कृपामार्ग, अनुग्रहमार्ग, भजनानंदमार्ग किंवा निरुपाधि स्नेहमार्ग. या पुष्टिभक्तीविषयीं प्रोफेसर मगनलाल शास्त्री स्वानुभवानें व अधिकारयुक्त वाणीनें म्हणतात–

" पुष्टिमार्गांतील पुष्टि ही भगवद्भक्ति असल्यानें धर्माचा पण धर्म आहे. ज्ञानाचें पण ज्ञान आहे. योगाचा पण योग आहे. सांख्याचें पण सांख्य आहे. तपाचें पण तप आहे. मुक्तीची पण मुक्ति आहे. भक्तीची पण भक्ति आहे. रसाचा पण रस आहे व lyric चे पण lyric आहे." हेंच पुष्टिभक्तीचे स्वरूप व रहस्य होय.

ही शुद्ध स्वतंत्र व निर्गुण होय ( त. दी. नि. ). व अशी भक्ति करणाऱ्यांना **श्रीवल्लभाचार्यांनीं** ' शुद्धपुष्टिभक्त ' असें म्हटलें आहे.

त्यांच्या सेवेचें फल प्रभूची नितांत सेवा करणें हेंच होय. यापेक्षां ते दुसरी कसलीच अपेक्षा करीत नाहीत. प्रभूचा अनुग्रह संपादन करणें हेंच त्यांचे व्यसन असतें. उदाहरणार्थ—व्रजसीमंतिनी शुद्ध पुष्टिभक्त होत्या. त्यांच्या भक्तीद्वारा प्रभूनें पुष्टिभक्तीचें स्वरूप दर्शविलें. म्हणून **श्रीवल्लभाचार्यांनीं** त्यांना या मार्गाचें आद्य गुरुपद दिलें आहे.

### ( ५४ ) गोपीजनांचें आदर्श गुरुपदः—

या मार्गाचे प्रणेते श्रीगोपीजन होत. **श्रीवल्लभाचार्यांनीं** त्यांना आपले आदर्शगुरु मानले आहे. कारण त्यांनी जी भक्ति करून दाखविली ती अतिशय श्रेष्ठ प्रतीची होती. अशाच भक्तीचा आपण आदर्श ठेवावा, त्यांच्याचप्रमाणें प्रभूनें आपणास आनंद द्यावा. हीच त्यांची इच्छा. कित्येक अज्ञानी लोकांचे म्हणणें असें कीं, या गोपी कामी होत्या व त्या या मार्गाच्या गुरु असल्यामुळें या मार्गाचे अनुयायीसुद्धां कामी असले पाहिजेत, तेव्हां हा एक विषयात्मक मार्ग आहे. परंतु थोड्या विचारांतीं त्यांना कळून येईल कीं, त्या बिलकूल कामी नव्हत्या. त्यांची श्रीकृष्णाचे ठायीं अनन्य व अव्यभिचारिणी भक्ति उत्कट दशेला पोंचलेली होती. त्यांच्या अशा भक्तींत विषयवासना संभवूच शकत नाहीं. जेव्हां रासोत्सवप्रसंगीं परम मार्मिक धर्मज्ञ श्रीकृष्णानी वेणुनिनाद करून आपल्या त्या मधुर मुरलीरवानें व्रजसीमतिनींना आकर्षून त्यांना वृंदावनांत बोलाविलें, आणि त्यांना अनेक निर्दय वचनें बोलून, त्यांच्या स्नेहार्द्र अंतः—करणाची कसोटी घेतली, तेव्हा कसोटीच्या उत्तरांत त्या म्हणतात—

**मैवं विभोऽर्हति भवान्गदितुं नृशंसं सन्त्यज्य सर्वविषयांस्तव पादमूलम् ॥ भक्ताः भजस्व दुरवग्रह मा त्यजास्मान्देवो यथाऽऽदिपुरुषो भजते मुमुक्षून् । ( भा. १०-२९-३१)**

"हे प्रभो ! हे सर्वसमर्थ ! अशा प्रकारें निर्दय वचन बोलणें तुला शोभत नाहीं. आम्ही सर्व विषयांचा त्याग करून तुझ्या चरणसेवे-करितां येथवर आलों आहों. भक्तपद मिळविलेलें आहे. आतां तूं आमचा म्हणजे भक्तांचा स्वीकार कर. भक्ताधीन हो. हे मिथ्या दुराग्रहिन् ! आमचा त्याग करूं नको. आदिपुरुष भगवान् विष्णु, जसा मुमुक्षुजनांचे मनोरथ पूर्ण करितो, तसा तूं आम्हां भक्तजनांचा अंगिकार करून आमचे हेतु पूर्ण कर." यावरून स्पष्ट होतें कीं, त्यांनी विषयाचा संपूर्ण त्याग केलेला होता. अशा निरुपाधि प्रेम-लक्षणा भक्तींत कामाचा–विषयाचा–आरोप करणें हें केवळ आपलें शास्त्रावरील अज्ञान प्रकट करण्यासारखें आहे. उद्धवासारखे ज्ञानी भक्त-पण यांच्या भक्तीची प्रशंसा करितात. बृहद्वामनपुराणांत ब्रह्मा भृगूला म्हणतात–

**स्त्रियो व्रजसुन्दर्यः पुत्र ! ताः श्रुतयः किल ।**
**नाहं शिवश्च शेषश्च श्रीश्च ताभिः समाः क्वचित् ।**

"हे पुत्र ! व्रजसुंदरी या साधारण स्त्रिया नाहींत. त्या तर निश्चित साक्षात् श्रुतिच होत. शिव, शेष, लक्ष्मी व मी हे सर्व याची बरोबरी करूं शकत नाहीं. त्या आमच्यापेक्षां श्रेष्ठ आहेत." कारण त्या वेदाच्या ज्ञानोपदेशिका ऋचा आहेत. ऋषि मुनींनीं करण्यास अशक्य असा सर्वस्वाचा त्याग त्यांनीं करून दाखविला. त्या त्यागमूर्ति आहेत. म्हणून त्यांचे स्थान या पुष्टिमार्गांत उच्चतम व श्रेष्ठतम मानिलें आहे. प्रभूवर त्यांचें किती निरतिशय व निर्हेतुक प्रेम होतें हें त्यांच्या विरहावस्थेनें दिसून येईल. प्रभूला त्या एक क्षणभरसुद्धां विसंरत नव्हत्या. त्यांचें अन्नरूप, वाणीरूप, प्राणरूप, नेत्ररूप व मनोरूप सर्वस्वी प्रभुच बनले होते !

**( ५५ ) गोपिकांचा विरहः—**

जेव्हां उद्धवानें गोकुळांतील गोपांगनांना श्रीकृष्णाचा संदेश सांगितला, तेव्हां त्या आपल्या प्रियतमाचा संदेश ऐकून विव्हल झाल्या. त्यांना स्वतःचें भान सुद्धां राहिलें नाहीं. ही त्यांची विरहावस्था व प्रभूवरील उत्कट प्रेम पाहून उद्धव म्हणतातः—

**एताः परं तनुभृतो भुवि गोपवध्वो**
**गोविंद एव निखिलात्मनि रूढभावाः ।**
**वाञ्छन्ति यद्भवभियो मुनयो वयं च**
**किं ब्रह्मजन्मभिरनन्त कथारसस्य** ॥ [भा.१०।४७।५८ ]

या पृथ्वीवर जन्मास येऊन या गोपीच खरोखर धन्य झाल्या आहेत. कारण सर्वांच्या अंतर्यामिं रहाणाऱ्या अशा श्रीकृष्णावर त्यांचा एकनिष्ठ भाव जडला आहे. संसाराला भिऊन गेलेले मुमुक्षु व मुक्त मुनिजन किंवा आमच्यासारखे साधक, हे ज्याची इच्छा करीत असतात, अशा त्या परमात्म्याच्या कथांशीं समरस होऊन जाण्याला ब्राह्मणाच्याच जन्माचा विशेष असा काय उपयोग आहे ? यावरून सिद्ध होतें की, श्रीकृष्णरसाचें पान करणारा कोणताहि जीव असला तरी त्याला दुःख करण्याचें कारण नाहीं. खरोखर गोपांगनाच मनुष्य देहाचें सार्थक करणाऱ्या होत. ते पुढें म्हणतात— ‘**अस्मदादयस्तु भक्ता अपि प्राप्तज्ञाना अपि मन्दभावप्राप्ताः**’— आमच्या सारख्या ज्ञानी भक्तांना भाव असतो; परंतु तो इतका उत्कट नसतो. असाच भाव पुष्टिमार्गीय वैष्णवांनींहि ठेवावा असा श्रीहरिरायजींनीं उपदेश केला आहे—“**षष्ठं व्रजस्थितानां यो भावः स्मार्यो वियोगिनाम्**—” विरहीभक्तांनीं व्रजस्त्रियांचा जसा प्रभूवर भाव होता, तसा तो ठेवावा व त्याचें स्मरण करावें. पुष्टिमार्गाचें हें सहावें लक्षण त्यांनी सांगितलें आहे. **श्रीवल्लभाचार्यांनीं** आपल्या

'निरोध लक्षण' ग्रंथांत अशीच प्रार्थना केली आहे कीं–"**गोपिकानां तु यद्दु:खं तद्दु:खं स्यान्मम क्वचित्**–" हे प्रभो ! गोपिकाना जसे विरहजनिततापानें दु:ख झाले तसें मला होवो. तुझ्याशिवाय माझा एक क्षणहि व्यर्थ न जावो. तूं मला पाहिजेस एवढेंच म्हणत माझा जीव अखंड तळमळत राहो" (नि. ल.) खरोखर हीच भक्तीची पराकाष्ठा होय !

कविश्रेष्ठ टागोरसुद्धां असेंच विरहदु:ख आपल्याला होवो म्हणून गीतांजलींत प्रभूची प्रार्थना करितात—

"If it is not my portion to meet thee in this my life, then let me ever feel that I have missed thy sight, let me no forget for a moment, let me carry the pangs of this sorrow in my dreams and in my wakeful hours"

[ या जन्मांत तुझे दर्शन–तुझी भेट–होणें हें जर माझ्या भाग्यांतच नसेल, तर तुझ्या दर्शनास–तुझ्या भेटीच्या लाभास–मी मुकलों. ही जाणीव माझ्यांत निरंतर राहो. एक क्षण मात्र देखील या गोष्टीचा मला विसर न पडो. आणि या दु:खाचें तीव्र भान–या दु:खाच्या तीव्र यातना-माझ्या जागेपणी तशाच माझ्या स्वप्नांतहि मला होवोत.]

अशा व्यसनावस्थेला पोंचलेल्या भक्ताच्या तोंडांतून "**हा नाथ रमण ! प्रेष्ठ ! क्वासि क्वासि महाभुज !**" असे अस्वास्थ्याचे उद्गार रसिक प्रभूच्या संगमार्थ निघत असतात. तेव्हां अशा विरहताप क्लेशांतून आनंदरूप प्रभूशिवाय कोण आनंद देईल ? तोच पूर्णानंद रसात्मक प्रभु आनद देईल.

## ( ५६ ) कर्ममार्गप्रवर्तक श्रीवल्लभाचार्य:—

कर्म, भक्ति व ज्ञान या तिन्ही मार्गांचें जेव्हां विकृत रूप बनलें तेव्हां श्रीवल्लभाचार्यांनीं या अनुग्रहात्मक भक्तीचा प्रसार करून

त्याचा सुंदर व्यवस्था केली. ते निरनिराळे न ठेविता त्याचा समुच्चय केल्यानें परमफलरूप भगवंताची प्राप्ति होते असा उपदेश केला. व त्यांचा सुवर्णमध्य साधला. व्यावहारिक कर्म करणें जरूरीचें आहे. पण त्याबरोबर प्रभुस्मरण करणेंहि तितकेंच आवश्यक आहे. हल्लीं आपल्या सर्व कार्यांत कोठें कोठें धार्मिक तत्वांना अर्धचंद्र देण्यांत आलेला दिसून येतो. परंतु त्यामुळें तें कार्य नीरस ठरतें. जसें आम्र-फलांतून मधुरता नाहींशी व्हावी, कस्तुरीचा मोहक सुगंध नाहींसा व्हावा, किंवा कोकिळेचा सुस्वर कंठ बेसूर व्हावा, तसें वरील कार्य नीरस व कुचकें ठरतें; परंतु त्याला भक्तितत्वाची-ईश्वरानुष्ठानाची-ईश्वरी अनुग्रहाची-जोड मिळाल्यास तें कार्य दुधांत साखर पडल्या-प्रमाणें अत्यंत गोड व सुरस ठरतें. तेव्हां निष्कामकर्म व भक्ति यांचें संपूर्ण सख्य जर कोठें पहाण्यांत येईल तर तें या मार्गांत होय.

आमचा वाद कर्मयोग श्रेष्ठ कीं भक्तियोग श्रेष्ठ हा नाहीं. **श्रीवल्ल-भाचार्यांनीं** पाहूं गेलें असतां यांत वाद घातला नसून उलट या दोघांचा समन्वय करूनच तो ईश्वरी अनुग्रहाला पात्र कसा होईल याच मुख्य विषयाचें प्रतिपादन केलें आहे. त्यांनीं कर्मयोग व तोहि निष्काम फलाशारहित परमेश्वरार्पणपूर्वक कर्मयोग प्रवर्तविला म्हणून **श्रीविठ्ठलेशप्रभूंनीं** आपल्या 'सर्वोत्तम स्तोत्र' ग्रंथांत "**कर्म-मार्गप्रवर्तक**" या नांवानें त्यांचा उल्लेख केलेला आहे. ( स. तो- १८ ). जो सिद्धांत गीतारहस्यकार लोकमान्यांनीं जनसमाजापुढें मांडला, तोच सिद्धांत साडेचारशें वर्षांपूर्वी-**श्रीवल्लभाचार्यांनीं**-पुष्टि-मार्गाच्या संस्थापकांनीं—निष्क्रिय झालेल्या जनतेंत तत्काली सर्वत्र देश संचार करून मांडला, हें विशेष होय. म्हणून प्रवृत्ति व निवृत्ति या मैत्रत्वाच्या भावानें जर कोठें नांदत असतील तर त्या या पुष्टी-मार्गांतच होय. यांत कर्माची फलाशा सोडून परमेश्वरार्पणपूर्वक कर्म

करण्याचा उपदेश केलेला आहे, एवढेंच नाहीं; परंतु हें सैव प्रभुमय आहे व त्यालाच अर्पण करून मी हें कार्य करितों, 'मी व माझें' ही भावनाच यांतून नष्ट केली म्हणजे तें कार्यसुद्धां कसें ब्रह्मत्वास पोचतें ( पृ. ६९ पहा) याचें सप्रमाण उत्तर या मार्गानें दिलें आहे. भक्ति करणें म्हणजे ईश्वरार्पणपूर्वक बुद्धीनें कर्म करणें हें सुद्धां मानव जातीचें एक पवित्र व उच्चतम कर्मच आहे. कर्मे दोन प्रकारचीं—एक एक चांगलें व दुसरें वाईट. हें ज्याला समजतें तो चांगलेंच कर्म अर्थात् उत्तम कर्म हातीं घेतो. म्हणून तेंच शेवटीं श्रेयस्कर ठरतें. तेव्हां भक्ति हें कर्म मानल्यानें कर्ममार्गास किंवा भक्तिमार्गास बाध येत नाहीं. आमच्या म्हणण्याप्रमाणें ईश्वरार्पणपूर्वक कर्म करणें काय किंवा भक्ति करणें काय सारखेंच. तेव्हां या कालांत प्रभुप्राप्ति सुलभरितीनें करून घ्यावयाची असल्यास भक्तिसारखा सोपा व सरळ मार्ग नाहीं.

या पुष्टिमार्गीय सिद्धांतानुसार ज्याचें वर्तन आहे, तो—" **धावन्निमील्य वा नेत्रे न स्खलेन्न पतेदिह**—" मनुष्य जरी डोळे झाकून चालला तरी त्याला ठोकर बसणार नाही. (भा. ११-२-३५) हें प्रभुकृपेचे फल होय. तसेंच—"**कालोऽयं कठिनोऽपि श्रीकृष्णभक्तान्न बाधते**—" जे श्रीकृष्णाचे निस्सीम भक्त आहेत त्याना हा कलिकाल कठिण असला तरी बाध करूं शकत नाहीं. केवल प्रभुकृपेचें अवलंबन केल्याने ह्या मार्गाची सुलभता दिग्दर्शित होते. हें **श्रीवल्लभाचार्यांनी** स्वोदाहरणानें स्पष्टपणें सिद्ध करून दाखविलें आहे. भगवंतांनी पण गुह्यांतलें गुह्यशास्त्र अर्जुनाला सांगतांना हेंच सांगितलें, "माझ्याठिकाणीं भक्ति ठेव, माझा भक्त हो, माझें यजनपूजन कर.....कारण अशा मच्चित्त झालेल्या लोकांचा विलंब न लावतां हे पार्था ! मी या मृत्युमय संसारसागरांतून उद्धार करीत असतों." ( गी. १२–७ )

हीच या मार्गाची सुलभता होय. हा पुष्टिमार्ग राजमार्ग आहे. प्रत्येक प्राणीमात्राला आचरणीय होऊं शकेल इतका तो सुलभ आहे, व त्यामुळेंच हा एक विश्वधर्म होण्याच्या योग्यतेचा आहे.

## ( ५७ ) पुष्टिमार्गाची श्रेष्ठताः—

सांप्रदायिक ग्रंथकार या मार्गाची श्रेष्ठता दर्शवितात ती अशीः—

**सर्वमार्गाणां पुष्टिमार्ग उत्तमः क्लेशाभावात् ।**
**इतरसर्वमार्गाणामतिशयक्लिष्टत्वात् ।**

" इतर सर्व मार्ग पुष्टिमार्गापेक्षां अतिशय क्लिष्ट असल्यामुळें हा पुष्टिमार्ग सर्व मार्गांपेक्षां उत्तम आहे. कारण यांत क्लेशाचा पूर्ण अभाव आहे. " पुष्टिमार्गीय भक्ताला अल्प पण क्लेश होत नाही. तो प्रभुजनानंदांत मग्न असतो. तेथें क्लेश किंवा त्रास बिलकूलच नसतो. इतर सर्व मार्गांत साधनासाठीं अतिशय क्लेश सहन करावे लागतात, उदाहरणार्थ—यज्ञादि साधन, वेदी आदि समारंभाची व्यवस्था पाहाणें, त्यांत आहुति टाकणें, त्याचें नियम पाळणें इत्यादि सर्व यज्ञसाधनें अतिशय त्रासाचीं व दगदगीचीं आहेत. कांहीं यज्ञ तर असे आहेत कीं ते कित्येक दिवस किंबहुना कित्येक वर्षेंहि चालतात. कुलगुरु शौनकांनीं चालविलेलें दीर्घसत्र बारा वर्षांनीं संपणारें होतें असा महाभारतांत उल्लेख आहे. तसेंच ज्ञानप्राप्तीसुद्धां क्लेशाशिवाय किंवा कष्ट सहन केल्याशिवाय होत नाहीं. "भगवान् शंकराचार्यांनीं वैदिक धर्माची उभारणी केली तथापि त्यांनीं प्रतिपादन केलेलें अद्वैतमत हें अत्यंत ज्ञानगम्य असल्यानें थोड्या समंजस व्यक्तीच्या बुद्धीलाच तें कायमचें आकलन होण्यासारखें होतें. सर्व सामान्य जनसमूह क्लेशदायक असणाऱ्या अव्यक्त, अचिन्त्य, व अनिर्देश्य अशा परब्रह्माच्या ठिकाणीं संलग्न होऊन राहाणें शक्य नव्हतें. मनुष्य-

बुद्धीला विलक्षण ताण सर्व साधारण लोकांकडून दिला जाणें शक्यच नाहीं. त्यांना परमेश्वरप्राप्तीचा कांहीं 'सुलभ उपायो' दाखवून देणे क्रमप्राप्तच होतें." ( गो. शु. इ. पृ. १२ ). म्हणून तो सुलभ उपाय **श्रीवल्लभाचार्यांनीं** पुष्टिमार्गानें दर्शविला. ज्ञानमार्गांतील सामान्य जनांस वाटणारा रूक्षपणा या मार्गांतील क्लेशाच्या संपूर्ण निरासानें त्यांनी नष्ट केला. यांत क्लेश होण्याचा संभवच थोडा. कारण या मार्गांत बालकृष्णाची स्नेहपूर्ण सेवा केली जाते. मातेला आपल्या मुलाची सेवा करितांना जसे क्लेश होत नाहींत, तसे यांत भक्ताला क्लेश होत नाहींत, त्याला सेवा करितांना आपल्याला क्लेश होतात याची जाणीवहि नसते. इतका तो प्रभुसेवेंत तन्मय होऊन जातो. दुसरें, ज्ञानानें मनुष्यास सत्यासत्य समजेल, बुद्धि शुद्ध व पवित्र होईल, तो संसारसिंधु तरूं शकेल, परंतु भक्तिविरहित ज्ञानामुळें तो प्रभुपदीं पोंचणार नाहीं. प्रभूला सर्वांपेक्षां त्याची निस्सीम भक्तिच प्रिय आहे व या भक्तीचाच या मार्गांत उपदेश केलेला आहे.

**श्रीवल्लभाचार्यांनीं** असा निर्मल व व्यापक अनुग्रहात्मक भक्ति-मार्ग प्रकट केला आहे कीं तो आचरणात आणल्यानें सर्व प्राणिमात्र निर्भय होतात. ते म्हणतात—

**मार्गोऽयं सर्वमार्गाणामुत्तमः परिकीर्तितः ।**
**यस्मात्पातभयं नास्ति मोचकः सर्वथा यतः ॥**

( त. दी. नि. स. नि. प्र. का. २३० )

हा भक्तिमार्ग सर्व मार्गाहून उत्तम सांगितला आहे. या मार्गांत पतनाचें भय नाहीं. तों सर्व प्रकारें मोक्षदायक आहे. इतर सर्व मार्गांत मनुष्याचें पतन केव्हां होईल याचा नेम नाहीं. परंतु येथें पतनाचा मुळीं संभवच नाहीं. कारण या मार्गांत प्रभुच सर्व प्रकारें

भक्ताचा योगक्षेम चालवितो. त्याला करण्यासारखें कांहींच नसतें. तो केवळ लोकसंग्रहार्थच कार्य करीत असतो, तेव्हां त्याचें पतन होण्याचा संभवच थोडा. वैदिकमार्ग त्रैवर्णिकांचा उद्धार करूं शकतो, पण हा वेदादि प्रस्थानचतुष्टयावरच उभारलेला पुष्टिमार्ग सर्व प्राणीमात्रांचा उद्धार करूं शकतो, इतका तो प्रभावशाली आहे. या मार्गाच्या आचरणानें प्रत्यक्ष भगवान् भक्ताच्या आधीन होतात इतका तो सामर्थ्यवान् आहे. त्यांतील सिद्धांतरत्नांच्या तेजानें सर्व पापें दग्ध होतात, इतका तो ओजस्वी आहे. त्यांच्या प्रकाशानें इतर सर्व मार्ग दिपून जातात, इतका तो उज्ज्वल आहे. यापेक्षां या मार्गाची अधिक थोरवी वर्णन करण्याचें सामर्थ्य माझ्या लेखणीच्या बाहेर आहे.

## ( ५८ ) श्रीवल्लभाचार्यांची विश्वमांगलिक शिकवणः—

सर्वांवर समबुद्धि ठेवून प्रभुभजन करणें हा पुष्टिमार्गीय सिद्धांत आहे. दीनता, सत्य, सदाचार व सद्वृत्ति हें ज्यांत आहेत त्याशिवाय प्रभु कोणाच्याहि हृदयांत वास करीत नाहीं. या सर्वांचा समावेश या पुष्टिमार्गांतील सेवाधर्मांत कसा होतो हें आपण मागें पाहिलें. ज्या धर्माच्या आचरणानें प्रभूंत अहैतुकी व अप्रतिहता भक्ति उत्पन्न होते तोच श्रेष्ठ धर्म व अशा भक्तीचीच **विश्वमांगलिक** शिकवण **श्रीवल्लभाचार्यांनीं** जनतेस दिली. परमश्रेष्ठ भक्त नारदानें याच धर्माचा उपदेश गाईला. यमराजानें पण याच धर्माचा प्रभाव कथन केला. योगेश्वरानें निमिराजाला याच धर्माचा उपदेश केला. भगवद्भक्त उद्धवाला दिलेल्या उपदेशांत याच धर्माचा महिमा सांगितला आहे. याच धर्माच्या आचरणानें व्रजभक्तांना प्रभूंचे ठिकाणीं सुदृढ व आत्यंतिक सर्वात्मभाव उत्पन्न झाला. तेव्हां आपल्या सारख्या अज्ञ जनतेसाठीं हाच मार्ग श्रेयस्कर, पंडित म्हणविणाऱ्या विद्वानास ब्रह्मज्ञानाच्या

मार्गाला जाऊं द्या. या युगांत वेदविहित कर्म होऊं शकतें असें म्हणणाऱ्यांना तें कर्म करूं द्या. आपणांस त्यांचा अधिकार नको. ज्या मार्गानें सर्व वर्ण, स्त्री, पशु, राजा, रंक व इतर सर्व प्राणिमात्र संसारबंधनांतून मुक्त होतात तोच खरा मार्ग. गोपांगना, उद्धव, प्रल्हाद, बलि, वृत्रासुर, राजा पृथु व अंबरीष यांनीं याच मार्गाचें अवलंबन केलें, व जन्ममरण फेऱ्यांतून ते कायमचे मुक्त झाले. तेव्हां अशा मार्गाचें जर आपण आचरण ठेविलें, तर प्रभूच्या अनुग्रहाला आपणसुद्धां पात्र होऊं यांत शंका नाहीं.



# शुद्धिपत्रक.

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| १० | २ | Branism | Brahmanism |
| १४ | १५ | मत्रांचा | मंत्राचा |
| १९ | ११ व २१ | प्रभूच | प्रभुच |
| ४३ | १३ | Omnipresnt. | Omnipresent. |
| ६३ | १३ | (भा. ११-१९-२९२४) | (भा. ११-१९-२४) |
| ७२ | १३ | हिंदूधर्माचा | हिंदुधर्माचा |
| ७६ | १७ | देवचें | देवांचें |
| ७७ | ५ | बाबती | बाबतींत |
| ८० | १ | बनाविल | बजाविलें |
| ८७ | १६ | लौकिक प्रभुवत् | लौकिकप्रभुवत |
| ९० | ५ | वात्यल्यस्नेहानें | वात्सल्यस्नेहानें |
| ९१ | १९ | शृणोत्यकणः | शृणोत्यकर्णः |